भारत-इतिहास-संशोधक-मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ६५

# ऐतिहासिक

# संकीर्ण निबंध खंड ३ रा

शा. १८६८ इ. १९४६



किंमत २ रुपये

Printed by Mr. Vitthal Hari Barve at the Aryabhushan Press, House No. 915/1 Shivaji-Nagar, Poona City and published by Sardar Gangadharrao Narayanrao Mujumdar, C. I. E., at 313A Sadashiv Peth, Poona 2, India.

## शिवचरित्र साहित्य खंड

| | | | | | | कि. रु. |
|---|---|---|---|---|---|---|
| खंड १ | स्वी. ग्रं मा. क्र. | ३० | पुरंदरे व द. वि. आपटे | पृ. १५४ | (श. १८४८) | १॥ |
| २ | ,, ,, | ३३ | मंडळचिटणीस | पृ. ४२६ | (श. १८५१) | ४ |
| ३ | पुरस्कृत ग्रं. मा. क्र. | २४ | शं. ना. जोशी व ग. ह. खरे | पृ. २७८ | (श. १८५२) | ३ |
| ४ | स्वीय ग्रं. मा. क्र. | ३८ | मंडळचिटणीस | पृ. १२६ | (श. १८५६) | १॥ |
| ५ | ,, ,, | ५५ | शं. ना. जोशी | पृ. ३६३ | (श. १८६४) | ३॥ |
| ६ | ,, ,, | ४७ | ग. ह. खरे | पृ. १५० | (श. १८५९) | १॥ |
| ७ | ,, ,, | ५० | कृ.वा.पुरंदरे व ब.द.आपटे | पृ. १६४ | (श. १८६०) | १॥ |
| ८ | ,, ,, | ५५ | शं. ना. जोशी | पृ. १३२ | (श. १८६४) | १॥ |
| ९ | ,, ,, | ६२ | शां. वि. अवळसकर | पृ. ११८ | (श. १८६६) | १॥ |

## ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड

| | | | | | कि. रु. |
|---|---|---|---|---|---|
| खंड १ | स्वीय ग्रं. क्र. ३५ | मंडळ चिटणीस | पृ. २०२ | (श. १८५३) | २ |
| २ | ,, क्र. ४२ | मंडळ चिटणीस | पृ. १०० | (श. १८५६) | १॥ |
| ३ | ,, क्र. ५४ | शं. ना. जोशी | पृ. ३३२ | (श. १८६३) | ३ |
| ४ | ,, क्र. ५६ | मंडळ चिटणीस | पृ. १८६ | (श. १८६४) | १॥ |
| ५ | ,, क्र. ६१ | मंडळ चिटणीस | पृ. ९५ | (शं. १८६५) | १॥ |
| ६ | ,, क्र. ६४ | शं. ना. जोशी | पृ. १०६ | (श. १८६७) | २ |

**ऐतिहासिक संकीर्ण निबंध** खंड १ (श. १८६५) पृ. ११२ कि. रु. १॥
,, ,, खंड ३ (श. १८६८) पृ. ७७ कि. रु. २

**पुणें नगर संशोधन वृत्त** खंड १ (श. १८६४) पृ. ८६ कि. रु. १
,, ,, खंड २ (श. १८६५) पृ. ७५–१७६ कि. रु. १॥
,, ,, खंड ३ (श. १८६८) पृ. १८७–२६९ कि. रु. २
[ तीनहि खंड एकदम ४ रु. ]

**दंडनीति**–वा. सि. बेंद्रे, प्र. ७६ ग्रंथ पृ. ६४ कि. रु. ३
ट. हं. वेगर्ळे

## ॲबट (महाराष्ट्र संतकवि) ग्रंथमाला

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ भानुदास डॉ. ॲबटकृत | | रु. १ | ७ तुकाराम | ,, | रु. १॥ |
| २ एकनाथ | ,, | रु. १॥ | ८ रामदास | ,, | रु. २ |
| ३ भिक्षुगीत | ,, | रु. १॥ | ९ भक्तविजय भाग १ ला | | रु. ३ |
| ४ दासोपंत | ,, | रु. १॥ | १० भक्तविजय भाग २ रा | | रु. ३ |
| ५ बहिणाबाई | ,, | रु. १ | ११ भक्तिलीलामृत | ,, | रु. ३ |
| ६ स्तोत्रमाला | ,, | रु. १ | १२ ज्ञानेश्वर | ,, | रु. ३ |

कापडी बांधणीस ८ आणे जादा.

# अनुक्रमणिका

# ऐतिहासिक संकीर्ण निबंध-खंड ३

## १ त्रिमूर्तींची कल्पना-उगम व विकास

( डॉ. अ. प. करमरकर, एम्. ए., एलूएल्. बी., पीएच्. डी., भा. वि. भ. मुंबई )

भारतीय संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगोपांगांचा विचार अजून सुसंपूर्ण रीतीनें झालेला नाहीं. किंबहुना प्राचीन भारतांतील ' राजकीय, आर्थिक, धार्मिक, कलात्मक वगैरे विषयांची चर्चा अजून व्हावयाची आहे. ह्या शतकाच्या पहिल्या पंचविशीपर्यंत भारतीय इतिहासाचा मूलभूत आधार म्हणजे ऋग्वेद होय अशी वेगवेगळ्या पंडितांची ठाम समजूत झालेली होती; व म्हणूनच आर्य, त्यांचें वसतिस्थान, त्यांचीं आक्रमणें, त्यांची भाषा, त्यांचा वंश वगैरे विषयांसंबंधीं विशेष ऊहापोह होऊन आर्यच जगाच्या सुधारणेचे मूलस्तंभ होत अशी कल्पना प्रसृत पावली होती; परंतु मोहेंजो-दडो वगैरे ठिकाणीं झालेल्या उत्खननामुळें वरील समजुतीस थोडासा धक्का बसला. कां कीं, आर्य येण्याच्या अगोदरचे येथील रहिवाशी जास्त सुसंपन्न असून, राजकारण, धर्म वगैरे बाबतींत तें जास्त श्रेष्ठ होते हे वरील स्थळीं उपलब्ध झालेल्या अवशेषांवरून दिसून येतें. असो. आज रोजीं फक्त त्रिमूर्तींच्या उगम व विकासासंबंधीं चर्चा करण्याचें ठरविलें आहे.

पुराणकालापासून त्रिमूर्ति ह्या शब्दाचा सामान्य अर्थ म्हणजे, ब्रह्मा, विष्णु आणि शिव यांचें प्रतीक होय. हे तीन देव सत्त्व-रज-तमात्मक पृथ्वीचे द्योतक असून त्यांच्याकडे अनुक्रमें सृष्टि, स्थिति आणि प्रलय असे जगाचे व्यापार असतात ते सांभाळण्याचें काम असतें. आतां यांतील मुख्य देव कोण या प्रश्नाचा उलगडा जो तो आपापल्या मतें करीत असतो. पुराणग्रंथांमध्यें ह्या गोष्टीविषयीं पुष्कळच काथ्याकूट केलेला आढळून येतो. कांहीं ठिकाणीं सृष्टीचें मूलभूत तत्त्व अव्यक्त, तर कांहीं ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, शिव, हे देव असल्याचें सांगितलें आहे. इतरत्र ब्रह्मा आणि विष्णु हे शिवाच्या उजव्या व डाव्या भागांतून निर्माण झाले असें वर्णन केल्याचें आढळतें. तदनंतर ह्या तीनही देवांमध्यें भांडणें कशीं निर्माण झालीं व तीं कशीं मिटलीं ह्याविषयीं निरनिराळ्या कथारूपानें माहिती सांगितली आहे. विष्णूनें

मोहिनीचें रूप घेतलें त्यावेळीं शिव त्याच्या पाठीमागें कसा लागला व त्याला पुत्र कसा झाला ह्याचें रसभरीत वर्णन वाचून मनास विस्मय वाटल्याविना राहात नाहीं. विशेषतः विष्णु व ब्रह्मा यांमध्यें श्रेष्ठ कोण याबद्दलचें भांडण चाललें असतां मध्येंच शिवलिंगाची उत्पत्ति कशी झाली आणि ब्रह्मा व विष्णु ह्या देवांना ह्या लिंगाच्या दोनही टोकांचा ठावठिकाणा कसा लागला नाहीं वगैरे वृत्तांत अत्यंत मनोरंजक स्वरूपाचा आहे. कसेंहि असो, ह्या मूर्तित्रयाचा प्राचीन इतिहास वर्णनीय आहे. तो येथें वर्णन करण्याचा आमचा इरादा आहे.

त्रिमूर्तीच्या उगमाविषयीं बार्थ, क्रूझर, कीथ वगैरेंनीं निरनिराळे अभिप्राय व्यक्त केले आहेत. तरी सामान्यतः मान्य झालेला अभिप्राय म्हटला म्हणजे त्रिमूर्तीची कल्पना वेदकालापासून अस्तित्वांत आली असून ह्या देवतांचीं त्रिकें सूर्य, वात, अग्नि अशा स्वरूपांत आलीं आहेत, एवढाच ( मैत्रायणी संहिता ४. १२. २ ) आहे. पुढील कालांत मैत्रायणी उपनिषदांत ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र हीं एकाच अव्यक्ताचीं अंगें असून तीं सत्त्व, रज, तमाचीं प्रतीकें होत असें म्हटलें आहे. याशिवाय ह्या मूर्तित्रयांचा उल्लेख प्राणाग्निहोत्र, ब्रह्मा, नृसिंहतापनीय आणि रामोत्तरतापनीय ह्या उपनिषदांत, महाभारतांत व हरिवंशांत केलेला आढळून येतो.

पण आमच्या मतें त्रिमूर्तीच्या कल्पनेचा उगम प्रथमतः शैवसांप्रदायांतच झालेला दिसून येतो. मोहेंजोदडो येथें एक तीन तोंडांची योगासनांत असलेली शिवाची आकृति आढळांत आलेली आहे. सर जॉन मार्शलनें तर्क केल्याप्रमाणें ह्या त्रिमुखी शिवाच्या आकृतीपासूनच पुढील त्रिमूर्तीची कल्पना सुचली असावी. एकंदर मोहेंजोदडो येथील लिखाणावरून शिव हाच जगाचा सृष्टि- स्थिति- प्रळय या तिहींस जबाबदार आहे असें सिद्ध होतें. व म्हणूनच ह्या तीनही अवस्थांचें निदर्शन म्हणून त्याची आकृति तीन तोंडांची बनविली असावी व ह्या म्हणण्यास दुजोरा ऋग्वेदांत आढळून येतो. तेथें एके ठिकाणीं असें नमूद केलें आहे कीं ‘ हे इन्द्रा, तूं तीन तोंडांच्या व सहा डोळ्यांच्या दासांचा पराभव केलास. ऋग्वेदांत अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत कीं, अनार्यांच्या संस्कृतीविषयीं फार त्वेषानें परंतु विकृत स्वरूपांत उल्लेख केलेले आहेत. अशाच पैकीं वरीलही एक होय. पुढील काळांत जगन्मुख (कुलू येथें), मेलचेरी ( उत्तर अर्काट जिल्हा ), गोकाक येथील धबधबा, उदयपूर संस्थानांतील चितोडगड, काश्मीर, मथुरा, चारसद्दा ( पेशावर ) वगैरे ठिकाणीं सांपडलेल्या शिवाच्या तीन तोंडी मूर्तींवरून वरील विधानास सबळ आधार सांपडतो. याशिवाय ‘ कुशाण राजा हुविष्क याच्या कांहीं नाण्यांवर त्रिमुखी शिवाची आकृति आढळांत येते.’ तसेंच बाल्हीक देशांत कुशाण–ससानियन गव्हर्नरांच्या कांहीं नाण्यांवर त्रिमुखी शिवाची आकृति उपलब्ध होत असल्याचें आम्हीं इतरत्र नमूद केलें आहे.

वरील गोष्टींवरून येवढें सिद्ध होतें कीं, मैत्रायणी उपनिषदाच्या काळापर्यंत जगांतील अत्यंत श्रेष्ठ देव म्हटले म्हणजे ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र हे होत, ही कल्पना प्रादुर्भूत झाली होती व ह्या कल्पनेचा विकास पुढील काळांत होत गेला. परंतु ह्या तीनही देवांची सांगड अजून शिल्पकलेंत आली नव्हती. आमच्या मतें असें करण्याचा प्रयत्न प्रथमतः इ. सनाच्या ५–६ शतकांत केला गेला असावा. एलेफंटा येथील महेशमूर्तीचें शिल्प हें अशाच संक्रान्तिकालांतील असावें. ह्या मूर्तीविषयीं विशेष ऊहापोह श्री. गोपिनाथराव व श्री. ग. ह. खरे यांनीं केलेलाच आहे.

एकदां त्रिमूर्तीची कल्पना अस्तित्वांत आल्यानंतर तिचा प्रसार निरनिराळ्या रीतींनें होऊं लागला. श्रीदत्ताची मूर्ति ही अशाच स्वरूपाची आहे. पाश्चात्य देशांतही याच कल्पनेचा प्रसार थोड्याशा निराळ्या रीतीनें झाला. टरट्यूलियनमध्यें व तदनंतर 'father, son, and spirit' ह्या स्वरूपांत ख्रिश्चन मंत्रांत सांगितलें आहे. इजिप्शियन धर्मांत ओसिरिस, आयसिस आणि होरस हे तीन मुख्य देव असल्याचें सांगितलें आहे. परंतु कल्पनांचा उगम भारतांतील मोहेंजो–दडो येथेंच उपलब्ध व्हावा हें आश्चर्य नव्हे काय ?

---

# २ परिभाषाभास्कर

( श्री. रघुनाथ कृष्ण पाटणकर, राजापूर )

पांचसहा वर्षांपूर्वी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या एका उत्सवांत श्रीनागेशभट्टांची "**परिभाषावृत्ति**" या अपूर्व ग्रंथाविषयीं परिचय करून देणारा माझा एक निबंध वाचून छापण्यांत आला. त्यानंतर गेले दोन वर्षांपूर्वी रत्नागिरी येथील ऋग्वेदशालेचे गुरुजी कै. वेदमूर्ति **केशवभटजी दामले** यांकडून तेथील प्रसिद्ध विद्वान् कै. वेदशास्त्रसंपन्न **विनायकशास्त्रीबोवा आगाशे** यांचेकडील कांहीं हस्तलिखित संस्कृत ग्रंथ येथील श्रीसंस्कृतपाठशाळेच्या श्रीसंस्कृत पुस्तकसंग्रहालयास मिळाले. त्यांत 'परिभाषावृत्ति' ग्रंथाची आणखी एक लिखित प्रति आली. तिचे अंतीं

शाकेक्षपण्नृपामिते १६६५ मार्गे शुक्लवेस्तिथौ
परिभाषावृत्तिमिमां व्यलिखद्दै दिवाकरः ॥

परिभाषावृत्तिमिमां ये पठिष्यन्ति मानवाः ।
तेषां स्वल्पेन कालेन शाब्दज्ञानं भविष्यति ॥

असें लिहिलें आहे. या पोथीचा आकार द्वादशपत्री असून २० पृष्ठांत ग्रंथ पुरा झाला आहे. पूर्वी मिळालेली 'परिभाषावृत्ति' ची पोथी या नव्या पोथीहून बरीच जुनी कदाचित् ग्रंथकाराशीं तुल्यकाल असेल; किंबहुना ग्रंथकाराचे हातूनहि लिहिली गेली असेल! ज्या ग्रंथसंग्रहांत ती पोथी उपलब्ध झाली तो श्री क्षेत्रकाशीहून मुंबईस ६० वर्षांपूर्वी विक्रीला आला असतां त्यावेळीं तेथें असलेले "लोकहितेच्छु" या मराठी-इंग्रजी साप्ताहिकाचे संपादक ब्रह्मीभूत श्रीवेदशास्त्रसंपन्न गोविंद रामचंद्रशास्त्री शेवडे (विखारे-गोठणें, राजापूर) यांनीं विकत घेतला. आणि दहा वर्षांनीं ते समाधिस्थ झाल्यावर त्यांचे चिरंजीव श्री. शिवरामपंत यांनीं तो येथील श्रीसंस्कृत-पुस्तक-संग्रहालयाला समर्पिला. हा ग्रंथसंग्रह इतिहासप्रसिद्ध काशीनगराधिपति महाराजा चेतसिंह यांचेकडील असावा असें, एका पोथीवर चेतसिंहमहाराजांनीं स्वतः आपलें नांव लिहिलें असल्यावरून अनुमान करितां येतें. **नागेशभट्ट**शिष्य **वैद्यनाथ पायगुंडे**-शिष्य व पुत्र **बाळंभट्ट पायगुंडे** हे प्रायः १५७५ ते १७५० ह्या कालांत विद्यमान असावे. अर्थात् शके १६०० चे सुमारास हा ग्रंथ रचिला गेला असावा व तो १६०० ते १६४० पर्यंत केव्हां तरी लिहिला असेल. नवीन पोथीच्या अक्षराचें वळण महाराष्ट्रीय आहे तर, जुन्या पोथीचें तद्देशीय आहे. ती पोथी नागेशभट्टाचे हातचीच आहे किंवा कसें हें निश्चित कळण्याला त्यांचे हातची एखादी अन्य पोथी उपलब्ध असल्यास तुलनेकरतां पाहिली पाहिजे. त्या प्रतीचीं पत्रें देशी, तर या नवीन पोथीचीं पोर्तुगीज आहेत. या ग्रंथाच्या उदीच्य आणि दाक्षिणात्य अशा दोन प्रति उपलब्ध झाल्या असल्यामुळें आतां हा लघु परंतु महत्त्वाचा आणि वैय्याकरणसिद्धांतकौमुदीबरोबर अध्ययन करण्याला योग्य असा ग्रंथ प्रकाशित होणें अगत्याचें आहे. आणि कळविण्यास आनंद वाटतो कीं पुण्याच्या आनंदाश्रमाचे व्यवस्थापक कै. दत्तात्रेय विष्णु आपटे, बी. ए. यांनीं तो प्रकाशित करण्याचें मान्यहि केलें होतें.

त्याच ग्रंथसंग्रहांत त्र्यंबकेश्वर येथील **भास्करभट्ट अग्निहोत्री** यांचा, जाड घोटीव अशा देशी पत्रांवर लिहिलेला, **परिभाषाभास्कर** हा ग्रंथ आहे. अक्षर प्रायः वळणदार आहे. आकार १० × ४॥ इंच आहे. पानें २७ (पाठपोठ ५४ पृष्ठें), प्रतिपृष्ठांत पंक्ति १८ आणि प्रतिपंक्तींत प्रायः ४८ अक्षरें आहेत. या मानानें ग्रंथसंख्या १४५८ भरते.

या ग्रंथांत पाणिनीय व्याकरणाच्या परिभाषांवर व्याख्या केली आहे. व्याकरण व परिभाषा यांवर कोणीं कोणते ग्रंथ केले आहेत याचें दिग्दर्शन प्रथम करणें आवश्यक वाटतें. या परिभाषाभास्कराबरोबरच **पाणिनिपरिभाषा पाठ** या नांवाचा

११॥ × ४ इंच लांबीरुंदीच्या आकाराच्या पाठपोट १॥ पानांत म्हणजे ३॥ पृष्ठांत लिहिलेला एक ग्रंथ आला आहे. त्यांत १२६ परिभाषा आल्या असून अंतीं " इति श्रीपाणिनिविरचिताः परिभाषाः समाप्ताः ॥ प्रभाकरदैवज्ञेन लिखितमिदं पुस्तकं स्वार्थं परार्थं च ॥ श्री आर्यादुर्गा कुलदेवतार्पणमस्तु ॥ असें आहे. कुलदेवतेच्या उल्लेखावरून हा प्रभाकर गुर्जर-उपाध्याय (पाध्ये) असून तो दैवज्ञ किंवा ज्योतिर्विदहि होता असें वाटतें.

श्रीव्याडिविरचिता ' पाणिनीयपरिभाषा या नांवाचा एक जीर्ण ग्रंथ हर्डी-राजापूर येथील कै. वेदमूर्ति नारायण सीतारामभटजी घाटे यांनीं आपल्या विद्वान् पूर्वजांचा अपूर्व-अमूल्य लिखित ग्रंथसंग्रह पूर्वोक्त संस्थेला दहा वर्षांपूर्वी दिला त्यांतून आला आहे. आकार ६ × ३ इंच असून पृष्ठें ९।६० आहेत. याचे अंतीं

इति व्याडिविरचिता पाणिनीयपरिभाषा ॥

शुभं भूयाच्छुभं भूयात्पठने पाठने तथा ।
भाषा व्याकरणस्येयं सेव्या विद्वज्जनैः सदा ॥१॥

गौरवाय(द)पि जातु मंत्रिणां दर्शनं प्रकृतिकांक्षितम् [ददौ*] ।
तद्गवाक्षविवरावलंबिना केवलेन चरणेन कल्पितम् ॥२॥

संवत् १६६३ चैत्र शुद्ध १३ गुरुवारे राक्षससंवत्सरे लद्भूगदाधरेण लिखिता ॥ इति ।

असें लिहिलें आहे; समाप्तींतील दुसरा श्लोक रघुवंश महाकाव्यांतील अंत्य सर्गांतील ( अग्निवर्णशृंगारवर्णनामधील ) सातवा आहे. त्यांतहि पूर्वार्धात पांचवें अक्षर ' द ' हें राहिलें तसेंच अंत्य पद ' ददौ ' हें हि राहून गेलें. लेखकानें हा श्लोक विनाकारण येथें समाविष्ट केला आहे. या परिभाषापाठांत १४३ परिभाषा आहेत.

याव्यतिरिक्त श्रीमदभिनवभट्टबाण कृष्णमाचार्य यांनीं ३० तीस वर्षांपूर्वी आपल्या व्याकरणग्रंथरत्नावली नांवाच्या ग्रंथमालेंतून श्री शेषाद्रि सुधीकृत परिभाषाभास्कर या नांवाचा व्याकरण-परिभाषाविषयक ग्रंथ तंजावर येथील श्रीकृष्ण मुद्रणालयांत छापून प्रसिद्ध केला. याची ग्रंथसंख्या प्रायः २५०० असावी. यांत ११० च परिभाषा आहेत. हा ग्रंथ नागेशभट्टांच्या मागून रचिलेला आहे असें पृ. ८० मध्यें "नञ्घटितमनित्यम् ॥८५॥" या परिभाषेंतील व्याख्यानांत "स्वेनापि ग्रन्थादौ 'प्राचीन वैयाकरणतंत्रे वाचनिकान्ति वाचनिकानि अत्र पाणिनीये तंत्रे ज्ञापकन्यायसिद्धानि इत्युक्तम् । यद्यपि 'भाष्यवार्तिकयोर्निबद्धानि परिभाषारूपाणि इत्युक्तम्" या परिभाषेन्दुशेखराच्या आद्य वाक्यांतील अवतरणावरून स्पष्ट दिसून येतें. या ग्रन्थाचे प्रारंभीं

नत्वा गुरुवरचरणं स्मृत्वा ब्रह्माखिलात्मकं विमलम् ।
रचयति शेषाद्रिसुधीः परिभाषाभास्करं स्वशिष्यकृते ॥

असा नमनश्लोक आहे. यावांचून याचें अधिक वृत्त कळलें नाहीं. तथापि शेषाद्रि या नांवावरून तो तिरुपति क्षेत्रांतील श्री वेंकटेश प्रभूच्या भक्तजनांतील एक असावा. तो परिभाषेंदुशेखरांतील अवतरणें उद्धृत करतो यावरून त्याचा काल २०० वर्षांपलीकडे जात नाहीं.

याप्रमाणें या संस्कृत व्याकरण परिभाषा विषयावर १ श्रीपाणिनीय परिभाषा, २ व्याडिकृत पाणिनीय परिभाषा, ३ नागेशभट्टकृत परिभाषावृत्ति, ४ नागेशभट्टकृत परिभाषेंदुशेखर, ५ भास्करभट्टकृत परिभाषाभास्कर, ६ शेषाद्रिसुधीकृत परिभाषाभास्कर असे सहा ग्रंथ आज उपलब्ध आहेत. यांतील पहिले दोन केवळ **परिभाषारूप** आहेत आणि इतर चार परिभाषाव्याख्यारूप आहेत. या चोहोंतील नागेशभट्टांचे दोन ग्रंथ असून त्यांतील शेखरावर तर अद्ययावत् २५ चे वर टीका झाल्या आहेत. त्यांतील कांहीं टीकांच्याही टीका आहेत. अवशिष्ट परिभाषाभास्कर दोन. यांतील पहिला नागेशभट्टानंतरचा किंवा पूर्वीचा याचें विवेचन पुढें करूं; परंतु दुसरा परिभाषाभास्कर हा निश्चित नागेशभट्टानंतरचा असल्याचें वर दाखविलें आहे. आतां प्रस्तुत **भास्करभट्टांच्या परिभाषाभास्करा**च्या विवेचनाकडे वळूं.

ग्रंथकारानें ग्रंथाच्या प्रारंभींच

आखण्डलादिसुरमंडलमंडनं तम् । उद्दण्डकोकविरहानलदण्डचण्डम् ॥
ईडेऽहमत्र बहुबोधितपद्मकाण्डम् । मार्तण्डमन्धतमसं प्रति कालदण्डम् ॥ १ ॥
श्रीगुरून् पितरौ नत्वाऽग्निहोत्री भास्कराभिधः ।
भास्करं परिभाषाणां तनुते बालबुद्धये ॥ २ ॥
युक्तायुक्ताभिज्ञं वन्द्यं भूयो भूयो विद्वद्वृन्दम् ॥
नामं नामं याचे मन्दो मान्यं चेदं शोध्यं सम्यक् ॥ ३ ॥
मृद्वी मृद्वीकया तुल्या वैरैरिव खलैरपि ।
नादृतेयं कृतिस्तस्मादस्माकं हानिरस्ति किम् ॥ ४ ॥

असें लिहिलें असून ग्रंथाचे अंतीं

परिभाषाकमलिनीर्युक्तिरुग्भिर्विलासयन् ।
भास्करः पण्डितालीनां स्वान्तं सानन्दयत्त्वलम् ॥ १ ॥
त्र्यम्बकेश्वरपुरीकृतवासादग्निहोत्रिकुलनीरधिचन्द्रात् ॥
पुण्यपूर्णपुरुषोत्तमभट्टादुद्बभूव सुकृती हरिभट्टः ॥
वेदवाक्यनिचयावचयेन प्रेक्षितो विधिरिवेह बुधौघैः ।
लोकगीतविमलायतकीर्तिः सोऽपि सज्जनमणिर्जयति स्म ॥ ३ ॥
तस्मादुद्भूतकीर्तिः कृतसुकृतभरान्मंत्रतंत्रस्वतंत्रः
साधूनामग्रगण्यो गददलनविधौ मानवानां शरण्यः॥

काशीक्षेत्राधिवासी हृतकठिनतराराातिषड्वर्गदम्भः।
श्रीमानापाजिभट्टः सुरभजनरतः शुद्धधीराविरासीत् ॥ ४ ॥
तनय इह तदीयोऽरीरचद्भास्कराख्यः फणिपतिभणितीनामाशयं भावयित्वा॥
परमतपरिभाषाभास्करं चार्पि यत्तत् सुरवरराविपादे सच्चिदानन्दरूपे ॥ ५ ॥
अत्राभ्यासो मनीषा वा सुकृतं वा न किंचन ।
मन्ये गुरुकृपाकल्पलतिकैवादिकारणम् ॥ ६ ॥

इति श्रीमत्काश्यपान्वयसंभवाग्निहोत्रिकुलतिलकायमानहरिभट्टसूनुश्रीमदापाजिभट्टसूनुभास्करविरचितः परिभाषाभास्करः समाप्तिमगमत् ॥

आगाशोपनामकगणेशेन लिखितमिदं पुस्तकम्। रौद्रसंवत्सरे दुर्गाख्ये घट्टे बिन्दुमाधवसंनिधौ ॥ श्रीगणेशार्पणमस्तु ॥

संपोष्यं सदपत्यवत्परकरात्संरक्ष्य सत्क्षेत्रवत्
संशोध्यं व्रणिनोऽगवत्प्रतिदिनं वीक्ष्यं च सन्मित्रवत् ॥
बन्ध्यं बध्यवदश्लथं च न हि विस्मार्यं हरेर्नामवत्
नैवं सीदति पुस्तकं खलु कदाप्येतद्गुरूणां वचः ॥ १ ॥ श्रीगणपतिर्जयति ॥

असें लिहिलें आहे. या सर्व वर्णनावरून हा ग्रंथकार त्र्यंबकेश्वर येथील काश्यपगोत्री अग्निहोत्रि कुलांतील पुरुषोत्तमभट्टाचा प्रपौत्र होय. पुरुषोत्तमभट्टाचा पुत्र हरिभट्ट हा वेदवाक्यवेत्ता असल्याबद्दल व सज्जनमंडळींत श्रेष्ठ म्हणून लोक त्याची कीर्ति गात असत. त्याचा पुत्र आपाजिभट्ट पित्याप्रमाणेंच कीर्तिमान्, पुण्यवान्, मंत्रतंत्रस्वतंत्र, साधूंमध्यें श्रेष्ठ, रुग्ण लोकांचे रोगपरिहार करण्यांत कुशल वैद्य, कामक्रोधादिषड्रिपु जिंकलेला, देवपूजनांत निरत असा होता. हा श्रीक्षेत्र काशीमध्यें वास करून राहिला होता. त्याचा पुत्र भास्करभट्ट हा पातंजलमहाभाष्यांत अर्थात् पाणिनीय व्याकरणशास्त्रांत पारंगत असून त्यानें त्या शास्त्राचें चांगलें मनन करून **परिभाषाभास्कर** हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत त्यानें उद्धृत केलेले ग्रंथ व ग्रंथकार यांवरून तो पदवाक्यप्रमाणपारावारीण अर्थात् व्याकरण–न्याय–मीमांसा शास्त्रांत प्रवीण होता. एवढेंच नव्हे तर साहित्यादि शास्त्रांत तो निष्णात असावा असें अनुमान काढणें अपरिहार्य आहे. ग्रंथाची भाषा स्वतंत्र बुद्धीची द्योतक असून परमतखंडनांतील त्याची मार्मिकता प्रशंसनीय आहे.

या ग्रंथांत ग्रंथकारानें

१ आकरः, २ कातंत्रविस्तरः, ३ काशिका ४ काशिकाविवरणपंजिका ५ [ किरणावली ] ६ कौमुदी ७ धातुवृत्तिः (माधवीया) ८ न्यासप्रसादः ९ पदमंजरी

कुसुमविकासः १० प्रदीपः ११ भागवतं १२ भाष्यम् १३ मनोरमा १४ यङ्लुगन्त-शिरोमणिः १५ रामायणं १६ रूपमाला १७ वाक्यपदीयं १८ विवरणं १९ शिरोमणिः २० शेषः २१ [संग्रहसूत्रं] २२ साहित्यदर्पणं २३ सिद्धान्तकौमुदी या ग्रंथांचा आणि १ अन्ये २ अपरे ३ आलंकारिकाः ४ [उद्यनः] ५ कश्चित् ६ काव्यप्रकाशकारः ७ केचित् ८ कैयटः ९ कैयटादयः १० गुरुचरणाः ११ चन्द्रगोमी १२ जीर्णाः १३ दीक्षिताः १४ नव्याः १५ न्यासकारः–न्यासकृत् १६ पाणिनिः १७ पुरुषोत्तमदेवः १८ प्रांचः १९ बोपदेवः २० भट्टपादाः २१ भट्टिः २२ भर्तृहरिः २३ भागवृत्तिकारः २४ भारविः २५ भाष्यकारः २६ मथुरानाथभट्टाचार्याः २७ माघः २८ माधवाचार्याः २९ ममांसकाः ३० मैत्रेयः ३१ रक्षितः ३२ वार्तिककारः ३३ विवरणकारः ३४ वृत्तिकारः ३५ व्याडिः ३६ श्रीधरादयः ३७ सीरदेवः ३८ हरदत्तः या ग्रंथकारांचा उल्लेख आलेला आहे. यांतील "व्यातेने किरणावलीमुदयनः ॥" या उदाहरणांत 'उदयनाने किरणावली रचिली' एवढ्यापुरता उल्लेख आहे, तसेंच 'क्रतूक्थादिसूत्रान्ताट्ठक्' या सूत्राचें उदाहरण म्हणून संग्रहसूत्रांचा उल्लेख आला आहे. गुरुचरणांचा उल्लेख आला आहे. हे कोण आणि यांचा ग्रंथ कोणता? कौमुदी आणि सिद्धान्तकौमुदी हे एकच कीं कौमुदी ग्रंथानें प्रक्रियाकौमुदी घ्यावयाची हें ते ग्रंथ पाहून निश्चित केलें पाहिजे. दीक्षित म्हणजे भट्टोजीच असावेत. विवरण शब्दानें महाभाष्य-प्रदीपावरील टीका उद्योतच असावी. अर्थात् त्याचा कर्ता नागेशभट्टच असावा. एके स्थळीं कैयटविवरणाचा एकत्र उल्लेख आहे. यावरून तर हें अनुमान दृढ होतें. अर्थात् **प्रस्तुत ग्रंथकार नागेशभट्टानंतर झाला असावा** असें मानतां येण्याला नड नाहीं. शेष ग्रंथानें त्रिकांडशेष घ्यावा असें वाटतें. इतर ग्रंथ आणि ग्रंथकार यांतील बहुतेकांचा परामर्ष श्रीयुत पंडित श्रीपाद कृष्ण बेलवलकर, एम्. ए., पीएच. डी. यांनीं आपल्या "संस्कृत व्याकरणाचे संप्रदाय" या ग्रंथांत घेतला आहे. "यङ्लुगन्तशिरोमणिः" हें काय आहे तें कळत नाहीं.

या ग्रंथकारानें व्याख्या करण्याकरितां 'पाणिनिपरिभाषा–' पाठच स्वीकारला आहे असें दिसतें. कांहीं स्थळीं पाठभेद आहेत तर पाणिनिपरिभाषापाठांतील ८१-८२ यांच्यामध्यें "क्वचिदुभयथा वाक्यसमाप्तिः" ही परिभाषा परिभाषाभास्करामध्यें दिली आहे; आणि ९६ 'परिहृत्यापवादविषयमुत्सर्गोऽभिनिविशते' ही परिभाषा परिभाषाभास्करांत घेतली नाहीं. पुढें १०३ "कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्य-संप्रत्ययः।" ही न घेतां तिचे स्थानीं "प्रधानाप्रधानयोः प्रधाने कार्यसंप्रत्ययः।" ही परिभाषाभास्करानें घेतली आहे. यापुढें ११६-११७ च्या मध्यें "यथोद्देशं संज्ञा-परिभाषं।" आणि "कार्यकालं संज्ञापरिभाषं।" या दोन परिभाषा आणि ११७-११८ च्या मध्यें "संदेहे बहुवचनं प्रयोक्तव्यम्।" ही तिसरी परिभाषा अशा अधिक घातल्या आहेत. तसेंच पाणिनिपरिभाषेच्या १०९।११०।१११।११२।११३।

११४ असा क्रम सोडून त्याचे स्थानीं ११२। ११३। ११४। १०९। ११०।१११ असा क्रम परिभाषाभास्करानें स्वीकारला आहे.

याव्यतिरिक्त या ग्रंथांत ग्रंथकारानें अष्टाध्यायीप्रमाणें आठ अध्याय आणि पादहि कल्पिले आहेत. **प्रथमाध्यायांत** प्रथमपाद १ ते १३। द्वि. पा. १४ ते १६। तृ. पा. १७ ते १९। च. पा. २० ते २७॥ **द्वितीयाध्यायांत** प्र. पा. २८ ते २९। द्वि. पा. ३१-३२। तृ. पा. ३३। च. पा. ३४॥ **तृतीयाध्यायांत** प्र. पा. ३५ ते ३९। द्वि. पा. ४० ते ४४। तृ. पा. ४५। च. पा. ४६।४७॥ **चतुर्थाध्यायांत** प्र. पा. ४८ ते ५१॥ द्वि. पा. ५२ ते ५४। तृ. पा. ५५। च. पा. ५६॥ **पंचमाध्यायांत** प्र. पा. ५७। द्वि. पा. ५८ तृ. पा. ५९। च. पा. ६०। **षष्ठाध्यायांत** प्र. पा. ६१ ते ६३। द्वि. ६४।६५। तृ. पा.+च. पा. ६६ ते ७६॥ **सप्तमाध्यायांत** प्र. पा. ७७ ते ८२। द्वि. पा. ८३ ते ८७। तृ. पा. ८८ ते ९३। च. पा. ९४ ते ९८॥ **अष्टमाध्यायांत** प्र. पा. ९९। द्वि. पा. १००-१०१॥ याच्या पुढें "अथ प्रायेण न्यायमूलाः परिभाषाः" असें म्हणून १०२ ते १२९ (१२६+३) पर्यंतच्या सर्व परिभाषा दिल्या आहेत.

ग्रंथकारानें आपले ग्रंथांत उल्लेखिलेले ग्रंथ आणि ग्रंथकाराचे ग्रंथ यांतील तीं तीं स्थलें पाहून ग्रंथकाराचे प्रतिपादनाशीं त्यांची तुलना करणें हें काम फार महत्त्वाचें आणि आवश्यक असलें तरी तितकेंच फार श्रमाचेंहि आहे; हें पूर्वनिर्दिष्ट ग्रंथ आणि ग्रंथकार यांचे नामनिर्देशावरून सहज लक्षांत येईल.

या परिभाषापाठांची तुलना करण्याकरितां सुलभता यावी म्हणून १ परिभाषावृत्ति + परिभाषेन्दुशेखर यांचें तुलनात्मक कोष्टक. २ पाणिनि परिभाषा (+ भास्करभट्टाचा परिभाषाभास्कर यांतील परिभाषापाठ यांची तुलना तेथेंच दाखविली आहे) ३ व्याडिकृत पाणिनीय परिभाषापाठ। ४ शेषाद्रिसुधीच्या परिभाषाभास्करांतील परिभाषापाठ+परिभाषेन्दुशेखरस्थ परिभाषापाठ + पाणिनिपरिभाषापाठ + परिभाषावृत्ति परिभाषापाठ + व्याडिकृत पाणिनीयपरिभाषापाठ अशा पांचांचें कोष्टक। इतकीं आम्ही एकत्र संपादिलीं आहेत. पाणिनि आणि व्याडि यांचा परस्पर आप्तसंबंध प्रसिद्ध आहे. दक्षाचा पुत्र दाक्षि आणि दाक्षीचा पुत्र दाक्षायण म्हणजे व्याडि. दक्षाची कन्या दाक्षी आणि दाक्षीचा पुत्र दाक्षेय म्हणजे पाणिनि. अर्थात् पाणिनीचा व्याडि हा मातुलपुत्र होय. पाणिनीनें व्याकरणावर अष्टाध्यायी रचिली तर व्याडीनें व्याकरणावर 'संग्रह' नांवाचा ग्रंथ केला. पतंजलीच्या वेळीं अष्टाध्यायीप्रमाणें संग्रह हा ग्रंथहि विद्यमान होता असें महाभाष्यांत त्याचीं अवतरणें घेतलीं आहेत त्यावरून स्पष्ट होतें. पुढें तो लुप्त झाला; तथापि तो लक्षग्रंथात्मक असल्याचें "संग्रहे एतत्प्राधान्येन परीक्षितं (शब्दो) नित्यो वा स्यात्कार्यो वेति" यांतील **संग्रह** शब्दाची व्याख्या करतांना 'उद्योतांते संग्रहो व्याडिकृतो लक्षश्लोकसंख्यो ग्रंथ इति प्रसिद्धिः।' असें

लिहिलें आहे. ( पस्पशाह्निक–महाभाष्य ). तसेंच “ उभयप्राप्तौ कर्मणि ” २।३।६६ या सूत्रावरील ‘ शेषे विभाषा ’ या वार्तिकावरील भाष्यांत “ शोभना खलु **पाणिनेः सूत्रस्य** कृतिः शोभना खलु **पाणिनिना सूत्रस्य** कृतिः । शोभना खलु **दाक्षायणस्य संग्रहस्य** कृतिः शोभना खलु **दाक्षायणेन संग्रहस्य** कृतिः ” अशीं उदाहरणें दिलीं आहेत. भाष्यांतील अवतरणावरून ‘ संग्रह ’ ग्रंथ व्याख्यारूप असावा असें दिसतें. आणि उद्योतांतील किंवदंतीवरून तो श्लोकात्मक असावा असें भासतें. “ क्रतूक्थादिसूत्रांताट्ठक् ” ४।२।६० या सूत्रावर सूत्रांताचीं उदाहरणें देतांना भाष्यांत ‘ वार्तिकसूत्रिकः सांग्रहसूत्रिकः ’ अशीं दिलीं आहेत. यांतील वार्तिकसूत्र कोणतें आणि संग्रहसूत्र कोणतें ? कात्यायन( वररुचि )वार्तिक हेंच वार्तिकसूत्र काय ? तसेंच संग्रहसूत्र हेंच व्याडीचा संग्रहग्रंथ काय ? कीं संग्रहसूत्र हा दुसऱ्याच कोणा ग्रंथकाराचा ग्रंथ ? तथापि भाष्यकारांनीं वार्तिकसूत्र व संग्रह युगपद् उदाहृत केलीं असल्यामुळें दोनहि व्याकरणाचे ग्रंथ पतंजलीच्या पुढें उपस्थित झाले. अष्टाध्यायी आणि संग्रह यांत पौर्वापर्य कसें आहे ? व्याडिकृत पाणिनीयपरिभाषा यावरून पाणिनिग्रंथोत्तरकालीं व्याडीनें परिभाषा संपादिल्या असें दिसतें. आणि सूत्रांताचें संग्रहसूत्र हेंच उदाहरण ( कारण वार्तिकसूत्र कात्यायनाचें इष्ट असेल तर अष्टाध्यायीहून पर ) असेल तर संग्रहसूत्र ( व्याडिकृत इष्ट असेल तर ) अष्टाध्यायी सूत्रपाठापूर्वी निर्मिलें गेलें असेल अशी ‘इतरेतराश्रयंतु’ या वार्तिकाप्रमाणें स्थिति झाली आहे ! याव्यतिरिक्त पाणिनिकालीं दुसरेंच संग्रहसूत्र- किंवा वार्तिकसूत्र विद्यमान होतें; या सर्व गोष्टींचा यथायोग्य परामर्श विद्वद्वृंद घेतील अशी पूर्ण आशा आहे. ग्रंथकाराचे विद्यमान वंशज किती आहेत ? कोठे आहेत ? तसेंच ग्रंथकाराचे पूर्व पुरुष आणि उत्तर पुरुष दाखविणारी वंशावळीहि मिळते काय ? त्याचे वंशांत आणखी कोण ग्रंथकार झाले ? त्यांनीं कांहीं ग्रंथ रचिले कीं काय ? ग्रंथकारानें आणखी कोणते ग्रंथ रचिले ? त्यांचे वंशजांकडे त्यांचा ग्रंथसंग्रह विद्यमान आहे कीं काय ? श्रीत्र्यंब- केश्वर आणि श्रीकाशी या क्षेत्रांमध्यें या वंशाचा शोध केला पाहिजे. कऱ्हाडे, कोक- णस्थ व देशस्थ ब्राह्मणांचे उपनामावलींत काश्यप गोत्री अग्निहोत्री उपनाम आढळत नाहीं. यावरून जोशी, नामजोशी, उपाध्याय, दीक्षित, काशीकर इत्यादि गुणप्राप्त गौण अथवा सोपाधिक नामें मूल उपनामांच्या स्थानीं स्थापित होऊन मूळ नांवांची स्मृति हि नष्ट करितात, त्याचप्रमाणें या अग्निहोत्री उपनामानें केले नाहीं ना ? शोध करणें आवश्यक आहे. येथवर केलेल्या विवेचनावरून प्रस्तुतच्या नव्या ग्रंथाचें महत्त्व, उपयुक्तता आणि प्रकाशित करण्याची आवश्यकता विद्वज्जनांचे

लक्षांत येईल. हाहि ग्रंथ आनंदाश्रमग्रंथावलींतून प्रकाशित करण्याविषयीं श्रीयुत दत्तोपंत आपटे यांना विनंति केली असतां तीहि त्यांनीं मान्य केली होती.

इतकें निवेदून हा अल्पसा प्रस्तुत प्रबंध पूज्यपाद श्रीगुरुचरणीं भक्तिपूर्वक समर्पण करितों.

---

# ३ चोंभा–कविकृत उखाहरण.

( श्री. य. ग. फफे, पुणें )

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शक १८३३ च्या इतिवृत्तांत चोंभाकविकृत उषाहरण हें एक त्रुटित काव्य छापलेलें आहे. त्यास कै. वि. का. राजवाडे यांनीं विस्तृत प्रस्तावना लिहिली असून अवघड शब्दांवर टीपाहि दिल्या आहेत. कित्येक दुर्बोध शब्दांचा अर्थ त्यांसही उलगडतां न आल्यामुळें त्यांवर त्यांनीं टीपांत प्रश्नचिन्ह घातलें आहे. ह्या दुर्बोध स्थलांचा निर्णय करणें हें भाषाशास्त्रज्ञ साहित्यिकांचें काम होय; पण तें आजवर कोणीं केल्याचें पाहण्यांत नाहीं. मराठी वाङ्मयांतील सर्व शब्दांचा समावेश करणें हें महाराष्ट्रशब्दकोशकारांचें कर्तव्य होतें; पण त्या कोशांत ह्या प्रश्नचिन्हांकित शब्दांचा प्रायः आढळ होत नाहीं. राजवाडे यांनीं ज्या शब्दांवर टीपा दिल्या आहेत ते शब्द व त्यांचा राजवाडे यांनीं दिलेला अर्थ यांचा मात्र समावेश कोशांत केलेला आढळतो. राजवाडे यांनीं दिलेले कांहीं अर्थ चुकले आहेत (हें पुढें दाखविण्यांत येईलच) त्यांचाही समावेश कोशांत जशाचा तसा करण्यांत आला असून त्यांपुढें उदाहरणादाखल तेथलींच अवतरणें दिलीं आहेत। यावरून कोशकर्त्यांनीं नुसत्या टीपाच तेवढ्या उतरून घेतल्या असाव्या, त्या टीपांतील अर्थ समर्पक आहेत कीं नाहींत हें मूळ काव्य पाहून निर्णीत केलें नसावें आणि टीपा नसलेले असे काव्यांतले शब्दही कोशांत संगृहीत केले नसावे असें अनुमान होतें. जी स्थिति उषाहरणाची तीच इतर अनेक ग्रंथांचीहि असणार. म्हणजे महानुभावीय ग्रंथ, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, मोरोपंतांचे समग्र ग्रंथ इत्यादि शेंकडों ग्रंथांच्या संपादकांनीं दिलेल्या टीपांचाच तेवढा जशाचा तसा समावेश कोशांत केल्यानें त्या त्या ग्रंथासंबंधीं काम भागलें असें कोशकारांनीं मानलें असावें; त्या टीपांत संपादकांच्या अनवधानतेनें किंवा गैरसमजुतीनें कांहीं चूकभूल झाली असेल तरिही कोशांत तशीच उतरलेली असावी व अशाप्रकारें कोशाचे प्रामाण्यास बरेंच वैगुण्य आलें असावें अशी साधार भीति वाटते. महाराष्ट्रशब्दकोश हाच सामान्य वाचक प्रमाण मानणार;

यामुळें कित्येक वेळां त्याची दिशाभूल होण्याचा संभव आहे. ही आपत्ति टळावी म्हणून विद्वान् साहित्यिकांनीं जुन्या ग्रंथांवर संपादकांनीं दिलेल्या टपिांचें सूक्ष्म परीक्षण करून दुर्बोध शब्दांचा अर्थ निश्चित करणें फार अगत्याचें आहे. ही आवश्यकता भाषाशास्त्रज्ञ साहित्यिकांचे निदर्शनास यावी म्हणून मीं येथें उषाहरणांतील दुर्बोध शब्दांचा थोडक्यांत ऊहापोह करण्याचें योजिलें आहे. तसेंच ह्या काव्याचे संबंधानें सुचलेले आणखीही एकदोन विचार येथेंच प्रदर्शित करणें उचित होईल असें समजून तेही येथेंच प्रारंभीं ग्रथित करीत आहे. कै. वि. का. राजवाडे यांचा भाषाशास्त्रांतील मोठा अधिकार आणि महाराष्ट्र–शब्दकोश-कारांचा प्रचंड उद्योग यांविषयीं अंतःकरणांत नितांत आदर असतांही केवळ कर्तव्य-बुद्धीनें मी या कार्यास प्रवृत्त झालों आहे हें प्रारंभींच सांगून ठेवणें अवश्य होय.

## १ काव्याचें नांव उषाहरण कीं उखाहरण?

या काव्याचें कवीनें योजलेलें नांव पृष्ठ ३ ओवी ३५ मध्यें पुढीलप्रमाणें आलें आहे. **चोंभा म्हणे अनुवादैन । उषाहरणीचा प्रबंधु ।** या ठिकाणीं पोथींत उषाहरण असा शब्द लिहिलेला आहे पण ह्या हस्तलिखित पोथींत नकलकारानें सर्वत्र **ख** च्या जागीं **ष** लिहिला आहे. **देखा, चोखडा, खडी, खेळते** यांचे जागीं अनुक्रमें **देषा, चोषडा, षडी, षेळते** याप्रमाणें येथून तेथून सर्वत्र **ख** चे स्थानीं **ष** लिहिला आहे. **ख** कोठेंच लिहिला नाहीं.

अर्थात् अशा ठिकाणीं **ष** लिहिला असला तरी कवीचें मूळ अक्षर **ख** हेंच असणार व तेंच वाचलें पाहिजे हें उघड आहे. तेव्हां **उषाहरण** ह्याचे स्थानीं कवीनें योजिलेला मूळ शब्द **उखाहरण** हा तर नसेल अशी शंका सहजच येते. एका स्त्री-गीताचें **उखाहरण** हें नांव प्रसिद्धच आहे.

उखाहरण पुण्यपावन ऐका चित्त देउन ।
चित्ररेखा ग तिची मैत्रिण ॥

हा त्या गाण्याचा प्रारंभ ऐकलेला पुष्कळांस आठवत असेलच. चोंभा कवीचें प्रस्तुत काव्य हें देखील एक स्त्रीगीत या सदरांत पडणारेंच काव्य आहे असें पुढें दाखविण्यांत येणारच आहे. तेव्हां कवीनें ठेविलेलें याचें नांव उखाहरण असेंच असण्याचा अधिक संभव आहे. कवि ह्या काव्यांत बाणकन्येला उषा म्हणतो कीं उखा म्हणतो ह्याचा निर्णय झाल्यास काव्याचें मूळ नांव कोणतें याचा उलगडा होईल; पण कवि उषा म्हणतो कीं उखा म्हणतो हें तरी कसें ओळखावयाचें? पोथीचा लेखक हे दोन्ही शब्द **उषा** असेच लिहिणार

यापाशीं **ख** हें अक्षरच नाहीं. तेव्हां याचा उलगडा कसा व्हावा? पण यासही दोन ओव्यांत मार्ग आहे. त्या ओव्या अशा:—

बाणु म्हणताये देषदेषा। तंव बुधी आठवली कुंभका।
तो गेला कुमरीचीया राउळा। जवळी बोलाविली उषा॥

पृ. ५७ ओवी ४९

या ओवींत **कुंभका** आणि **उषा** हे दोन शब्द अनुक्रमें द्वितिय व चतुर्थ चरणांचे अंतीं आले आहेत. या काव्यांतील ओव्यांत द्वितीय व चतुर्थ चरण सयमक आहे. या नियमानुसार येथें **का-षा** ह्या अन्त्याक्षरांचा उच्चार यमक साधेल असाच करणें प्राप्त आहे. या काव्यांत क-ख; ट-ठ, त-थ यांचीं यमकें कवीनें पुष्कळ योजिलेलीं आहेत. त्यांपैकींच यमक येथेंही आहे. अर्थात् यमकासाठीं येथें **उखा** असाच उच्चार करणें प्राप्त आहे.

प्रेमें पींसी जाली उषा। सर्वेची नीगो पाताये देषा॥

पृष्ठ ८० ओवी १०५

यांत द्वितीयचरणांतीं **देषा** असें लेखन पोथींत असलें तरी तो शब्द देखा असाच आहे. **देखा** याशीं सयमक होण्यासाठीं कवीनें प्रथम चरणांतीं उखा असाच शब्द योजिला असला पाहिजे हें उघड आहे. या दोन स्थळीं जसें **उखा** असेंच वाचलें पाहिजे हें सिद्ध करितां येतें, तसें **उषा** च वाचलें पाहिजे आणि उखा असें वाचून चालणारच नाहीं असें एकही स्थळ ह्या काव्यांत नाहीं. तेव्हां कवीनें योजिलेलें काव्याचें नांव **उखाहरण** असलें पाहिजे असें ठरतें.

२ ओवी छंदांत पहिले तीन चरण सयमक व चौथा निर्यमक असतो. पण चोंभा कवीच्या ह्या काव्यांत प्रथम, द्वितीय व चतुर्थ चरण सयमक असून तृतीय चरण निर्यमक आहे ही एक विलक्षण गोष्ट आहे असें राजवाडे म्हणतात. तसेंच यांत ओवीचा चतुर्थ चरण तोकडा नसून पूर्ण लांबीचा आहे ही हि एक विलक्षण गोष्ट आहे असेंहि ते सांगतात. पण ह्यांत विलक्षण कांहीं नसून हें नियमानुसारच आहे असें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

ओवीचे अनेक प्रकार आहेत. (१) एक प्रकार ज्ञानेश्वरी ओवी. हींत पहिल्या तीन चरणांच्या मानानें चौथा तोकडा-सुमारें निम्मे लांबीचा असतो आणि पहिले तीन चरण सयमक तर चौथा निर्यमक असतो. (२) दुसरा प्रकार एकनाथी ओवीचा. हींत पहिल्या तीन चरणांच्या मानानें चौथा चरण तोकडा तर नसतोच; पण क्वचित् अधिक लांब असतो. शिवाय त्याचे दोन भाग असून त्यांतील पहिला भाग मागील तिन्ही चरणांशीं सयमक असतो व दुसरा भाग तेवढा निर्यमक असतो. (३) ओवीचा

तिसरा प्रकार म्हणजे झोपाळ्यावरील ओवी. हींतील चौथा चरण ज्ञानेश्वरी ओवी-प्रमाणेंच तोकडा–अर्ध्या लांबीचा–असतो. पण हींत दुसरा व तिसरा हे चरण सयमक व इतर निर्यमक असतात ही विशेष गोष्ट होय. (४) ओवीचा आणखी एक प्रकार आहे. तो म्हणजे जात्यावरील ओवी. हीसच जानपद ओवी अशी संज्ञा देण्यांत आली आहे. या ओवीचा चतुर्थ चरणही पूर्ण लांबीचा असतो आणि द्वितीय व चतुर्थ चरण नियमानें सयमक असतात. चरणाच्या मात्रा सामान्यतः १६ असतात. क्वचित् १२ किंवा १४ असतात. अक्षरें कमजास्त असलीं तरी म्हणतांना तीं एवढ्याच मात्रांत उच्चारतात. चोंभा कवीचें प्रस्तुत उदाहरण-काव्य याच जानपद ओवीवृत्तांत रचलेलें आहे व म्हणून त्यांतील द्वितीय–चतुर्थ चरणांचें यमक व चतुर्थ चरणाची पूर्ण लांबी हे, राजवाडे यांस भासले त्याप्रमाणें, विचित्र प्रकार नसून नियमबद्धच आहेत असें दिसून येईल. उदाहरण काव्य जानपद ओवी वृत्तांत असल्यामुळें तें एक स्त्रीगीत आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

यमकासंबंधानें ह्या काव्यांत फारच विचित्र प्रकार आहे. इतका कीं, जगांतील कोणत्याही भाषेंतील कोणत्याही काव्यांत तो आढळावयाचा नाहीं असें वर्णन राज-वाडे यांनीं केलें आहे व निर्यमक कविता मराठींत रचण्याचा पहिला मानही ह्या कवीस दिला आहे. राजवाडे ह्यांचीं हीं विधानें यथार्थ आहेत कीं नाहींत हें कळावें म्हणून ह्या काव्यांतील यमकांचें परीक्षण करणें अवश्य आहे.

चोंभा कवीनें दुसऱ्या व चौथ्या चरणांबरोबरच पहिला चरणही बहुतेक ठिकाणीं सयमक योजिला आहे ही एक विशेष गोष्ट होय. पहिला चरण सयमक असणें जानपद ओवीस आवश्यक नाहीं. तेव्हां चोंभा कवीच्या ह्या काव्यांत क्वचित् कांहीं ठिकाणीं पहिला चरण निर्यमक राहिला आहे. यामुळें वास्तविक कांहींच बिघडलें नाहीं हें उघड आहे. जानपद ओवीच्या लक्षणाप्रमाणें द्वितीय व चतुर्थ चरण सयमक आहेत कीं नाहींत हेंच पाहिलें पाहिजे. ते सयमक नसतील तरच त्या ओवीस निर्यमक म्हणतां येईल, एरवीं नाहीं, हें उघड आहे.

या कवीच्या यमकांत कांहीं विशेष प्रकार आढळतात ते आधीं पाहणें अवश्य आहे. या काव्यांत क–ख, ट–ठ, त–थ, ग–घ, ज–झ, ड–ढ, द–ध, ब–भ, न–ण यांचेंही यमक जुळविलेलें आढळतें. या अक्षरांच्या जोड्यांत मुख्यत्वें अल्पप्राण व महाप्राण एवढाच फरक आहे. म्हणजे महाप्राणाकडे दुर्लक्ष करून हीं यमकें जुळविलेलीं आहेत. पुष्कळ लोकांच्या बोलण्यांत हा महाप्राण उच्चार स्पष्ट होत नाहीं. यामुळें या जोड्यांतील अक्षरांचा उच्चार बराचसा परस्परसदृश होत असतो हें सूक्ष्मदर्शी विद्वज्जनांचे ध्यानीं असेलच. तेव्हां ह्या अक्षरांचें यमक जमविणें हीं कांहीं नियमबाह्य अनुचित गोष्ट नव्हे. शिवाय अशीं यमकें ह्या एकाच कवीनें

जमविलीं आहेत असेंहि नाहीं. जुन्या कवींनीं तीं सरसकट योजिलेलीं आहेत. उदाहरणार्थ एकनाथी भागवताचा पहिलाच आध्याय पहा. त्यांत भावना-मीतूपणा (आवी१), बोजा – तुझा (ओ. ५), सृष्टि-उठी (ओ. ७), सुख – मोदक (ओ. १३), नाथा – नमिता (ओ. १६), मकरंदू – संबंधू (ओ. २०), सांकडे – पुढें (ओ. ४०), विश्वास – प्रकाश (ओ. ४१) अशीं यमकें जमविलेलीं पदोपदीं आढळतील. ज्ञानेश्वरींतही इतस्ततः हीं यमकें आहेत.

चोंभा कवीनें क्वचित् नाहीं-ठायीं, घायीं-कांहीं, जाये-बाहे, आहे-पाये, राहो-संदेवो अशीं यमकें स्वीकारलेलीं दिसतात. पण हीं देखील जुन्या कवींची सार्वत्रिक रीतच आढळते. एकनाथी भागवताचे पहिल्या अध्यायांत लाहो-भावो (ओ. ६१), अनुभवो-पहा हो (ओ. १४६), सहस्रबाहो-अहंभावो (ओ. ७४,) जाये-पाहे (ओ. २५८), क्षयो-देवो (ओ. २८८) इत्यादी यमकें आलेलीं आहेत. बोलण्यांत नाहीं-चा उच्चार नाई आणि ठायीं याचा ठाई असाही होतो. अशा प्रकारें उच्चारानुसार नाई-ठायीं यांवरून नाहीं-ठाई यांचें यमक कवी जमवितात. याच रीतीनें अन्याय-अन्याव उपाय-उपाव अशीं रूपें होत असल्यामुळें कांहीं विशिष्ट शब्दांपुरतें य-चें व-शीं यमक सहजच जमतें. रावो-राओ, संदेहो-संदेओ अशा प्रकारें ह्या दोन्ही शब्दांच्या अन्त्याक्षरांच्या उच्चारांत साम्य येत असल्यामुळें त्यांचेंहि यमक अयुक्त होत नाहीं. आणि अशीं यमकें जुळविणें हा कांहीं एकट्या चोंभा कवीचा विशेष नाहीं, ती जुन्या कवींची सार्वत्रिक रीतच असल्याचें आढळतें.

उखाहरणांत पृ. ७ ओवी ६८ येथें दैत्यु-अमीतु असें यमक आढळतें. पण ह्या काव्यांत अन्यत्र दैत्य, दैत्यु यांचे ऐवजीं दैत, दैतु असे शब्द योजिलेले आढळतात. (५७-४३ पहा). तेव्हां वरील ओवींत नकलाकरानें दैत्यु लिहिलें असलें तरी कवीचा शब्द दैतु असाच असावा व तो धरल्यास दैतु-अमीतु हें यमक ठीक जमतें. पृ. ७७ ओ. ६५ यांत कैवल्य शब्द आहे, तेथेंही कवीचा मूळ शब्द कैवल किंवा कैवला असाच असावा. पृ. ११९ ओ. ४५ मध्यें वदन याचे जागीं वदनें असा पाठ अर्थासाठीं आवश्यकच आहे. तो घेतल्यानें सुदर्शनें-वदनें हें यमक नीट जमतें आणि कवीनें यमकांत भिन्न स्वर योजिले हा त्यावरील आक्षेप निर्मूल होतो.

या काव्यांतील यमकांत एक प्रकार मात्र विशेष दिसून येतो. तो म्हणजे अकारान्त व आकारान्त शब्दांचें यमक जमविणें; आणि हा प्रकार चारदोन वेळांच झाला नसून ६२ वेळां झाला आहे! अर्थात् कवीनें विचारपूर्वकच ही योजना केली असली पाहिजे असें म्हणणें प्राप्त आहे. चरणान्तींच्या अक्षराचा उच्चार दीर्घ होतो यामुळें चरणान्तीं ऱ्हस्व इकारयुक्त किंवा ऱ्हस्व उकारयुक्त अक्षर आलें तरी त्याचा

उच्चार दीर्घ होत असल्यामुळें त्याचें ईकारयुक्त किंवा ऊकारयुक्त अक्षराशीं यमक जमतेंच. याच रीतीनें अ चा दीर्घ **आ** असल्यामुळें त्या दोहोंचें यमक जमण्यासही प्रत्यवाय नसावा अशी कल्पना बहुधा कवीच्या मनांत आली असेल व म्हणून त्यानें **अकारान्त** व **आकारान्त** शब्दांचीं यमकें मुद्दाम योजिलीं असतील. पण याचें दुसरेंहि एक कारण संभवतें व तेंच अधिक प्रबल आहे असें आम्हांस वाटतें. तें कारण म्हणजे सामान्य जानपदांच्या बोलींत वाक्यांतींचा **अकार** तोकड्या **आकारा** सारखा उच्चारला जातो. हाच प्रकार वैदिक उच्चारणांतही दिसून येतो. पद्यांतील चरणांतींच्या अकाराचा जो दीर्घ उच्चार करावयाचा तोही ह्या जानपद व वैदिक रीतीप्रमाणें आकारसदृश झाल्यास साहजिकच त्याचें आकारान्त अक्षराशीं यमक जमेल. असा कांहीं विचार कवीनें केला असला पाहिजे असें, या प्रकारच्या उदाहरणांच्या बाहुल्यावरून म्हणावें लागतें.

चोंभा कवीनें निर्यमक कविताही केली आहे असें राजवाडे म्हणतात. तसें म्हणावयास वरील चाळणींतून अवघ्या चार ओव्या उरतात. त्यांचा आतां विचार करूं.

पहिलें स्थळ–गाईचेनि तोंडें विनवी। विष्णु राषें राषें पृथ्**वी**
सरण आलीये गोविंद देवा। वोखें फेडी फेडी स्वा**मी** ॥ ४४ ॥

या ओवींत पृथ्**वी**–स्वा**मी** निर्यमक आहे. येथें मूळ काव्यांत कांहीं पाठांतर असेल काय? गोस्वामी > गोसावी; स्वामी > सावी > साई > साई हाच शब्द रूढ आहेच. त्याचें पूर्वरूप जो सावी शब्द तो किंवा **गोसावी** हाच शब्द येथें मूळतः कवीनें योजिला असेल. गोसावी=स्वामी, धनी. वरील ओवी लिहितांना धनी ह्या अर्थाचा गोसावी हा शब्द कवीच्या दृष्टीपुढें होता असें म्हणावयास एक गमकही आहे. तें म्हणजे याच्या पुढील दुसऱ्याच ओवींत "तो गोसावी आमुचा" अशा प्रकारें कवीनें स्वामी ह्या अर्थानेंच गोसावी हा शब्द योजिला आहे.

दुसरें स्थळ— अरे प्रद्यना सुभटा। तुम्ही यादव सर्व कप**ट**।
दंदयोधीं ऐसा धर्मु। आणिकीं घालूं नये आड ॥ १३७५ ॥पृ.१२१

येथें यमकांत कप**ट**–आड अशी जोडी आली आहे. व्यंजनभेदामुळें येथें यमक जमत नाहीं असें भासतें. पण येथेंहि पाठांतर संभवतें. आड प्रमाणेंच आ**ट**–अ**ट** यांचाही अर्थ अडथळा असा होतो. तेव्हां कवीनें येथें **अट** हा शब्द योजिला असणें शक्य आहे. नकलकारास त्याचा अर्थ न कळल्यानें त्यानें **आड** असा अपपाठ घातला असेल. **ट** आणि **ड** परस्परांऐवजीं पुष्कळदां येतात हें **अट**काव–अडकाव इ. शब्दांवरून उघड आहे. तेव्हां हें स्थळही स्पष्टपणें निर्यमकाचें असें म्हणण्याजोगें नाहीं.

तिसरें स्थळ—दोन्ही राहावरींचे घोडे। दोंही रथींचें दळवाडें!
दोन्ही सारथी महारथी! मुगुती पाववीती येके वेळे॥ १५८२

येथे डे-ळे यांचें यमक आहे. ड चे स्थानीं ळ हा उच्चार वेदांतही होतो, अशा दृष्टीनें ह्या दोन वर्णांचा अभेद कल्पून कवीनें हें यमक स्वीकार्य मानलें असावें असें दिसतें.

चौथें स्थळ- ब्रह्मसत्त्वाचा प्रतापु! आणि ईश्वराचा कोपु।
दोन्ही जालीं एकवाट। आंदोळला सत्यलोकु॥ १६८७॥

येथें कोपु-लोकु यांमध्यें अन्त्याक्षरांतील व्यंजनें भिन्न असल्यामुळें यमक जमत नाहीं हें खरें, तथापि पूर्वापर स्वर समानच आहेत; तेव्हां हें ही पूर्णपणें निर्यमकाचें उदाहरण नव्हे.

निर्यमकाचीं म्हणून भासणारीं अशीं जीं केवळ चारच उदाहरणें उखाहरण काव्यांत आहेत त्यांची ही अशी स्थिती असल्यामुळें आधुनिक कवि ज्या निर्यमक कविता कचित् करतात तशा प्रकारच्या निर्यमक कविता रचण्याचा मान चोंभा कवसि मुळींच मिळूं शकत नाही हें स्पष्ट आहे.

येथवर उखाहरण काव्याचे प्रस्तावनेंतील कांहीं विवाद्य गोष्टींचें विवेचन केलें. आतां प्रस्तुत काव्यांतील दुर्बोध शब्दांकडे वळूं. पुढें अवतरणासमोर जे आंकडे दिले आहेत ते पोथीचें पान व ओवीचा अंक यांचे दर्शक आहेत.

(१) जरी बैसलेयां देषें संत। आरत मनन केची तेथ॥ ३-३२॥
येथें पोथीच्या लेखकानें योजलेला अपपाठ आणि संपादकांनीं केलेला चुकीचा पदच्छेद ह्या दोहोंमुळें दुर्बोधता आली आहे. यांतिल द्वितीय चरण **आरत मनन घेचि तेथ** असा असावा. तो घेतल्यानें अर्थ नीट जुळतो. कवि भवानीची प्रार्थना करितांना आपल्या मनाची ठेवण सध्या कशी आहे तें येथें सांगत आहे. साधुसंत बसलेले पाहतांच त्या ठिकाणीं जाण्याची आवड माझे मनानें घ्यावयास हवी; पण ती तें घेत नाहीं, अशी तक्रार कवि करीत असून ती आवड घेण्याची प्रेरणा मनास देण्याविषयीं तो पुढें भवानीची प्रार्थना करीत आहे. ह्या प्रसंगावरून येथील पाठभेद व आरत=आवड हा अर्थ स्पष्ट होतो.

(२) सुकदेवो अनुवादला। ईश्वर तांड(व) वनासि गेला।
तैं पांच वाजौनी। बाणासुरें रीझवीला॥ ७-६५॥

पाष= पाख = एक प्रकारचें वाद्य, हें संदर्भावरून उघड आहे. पाख = पक्ष पक्षवाद्य = पखवाज. यावरून पाख = पखवाज असावा. पण ह्या अर्थानें पाख हा शब्द महाराष्ट्रशब्दकोशांत दिलेला नाहीं. राजवाडे यांनीं ह्या शब्दावर टीप दिलेली नाहीं. यामुळेंच तो कोशांत आला नाहीं असें उघड दिसतें. टीपा देणाऱ्या संपादकास जे शब्द दुर्बोध वाटतात तेवढ्यावरच ते टीपा देतात. पाष शब्दावर येथें टीप कां नाहीं. याचे उत्तर संपादकास तो शब्द दुर्बोध वाटला नाहीं असें देतां येणें शक्य आहे; पण हा शब्द कोशांत कां नाहीं ह्याचें उत्तर काय? कोशांत दुर्बोध सुबोध सर्वच शब्द व त्यांचे सर्व अर्थ द्यावे लागतात. तेव्हां हा शब्द कोशांत न येण्याचें कारण कोशकारांनीं छापील पद्य ग्रंथांतील केवळ तळटीपाच तेवढ्या उतरून घेतल्या; मूलत: ते ग्रंथ पाहून त्यांतील सर्व शब्दांचा संग्रह स्वत: करण्याचा उद्योग केला नाहीं; ह्याहून दुसरें कोणतें असणार?

( ३ ) वाईत वातां संतोषला देवो। बाणासी दीधला पासावो ।७–६६

बाणावर देव शंकर जो संतोषला तो बाणाच्या कोणत्या कृतीमुळें? वरल्याच ओवींत बाणानें पाख वाजवून शंकरास रिझविल्याचें वर्णन आहे. अर्थात् या ओवींतून "(पाख) वाजविल्यानें–वाजवीत असतां" असा अर्थ निघाला पाहिजे. **वाईत वातां** यांतील **तां** हें अक्षर दोन घरें मागें घेतल्यास म्हणजे **वाईतां तवां** असें केल्यास तो अर्थ निघेल- वाइणें=वाजविणें वाइतां=वाजवीत असतां, तवां=त्या-वेळीं. यावरून स्पष्ट दिसतें कीं, **वाइतां तवां** असाच मूळ पाठ असला पाहिजे. राज-वाडे यांनी वाइ=वायु असा अर्थ दिला आहे व वाइचा ओखद वगैरे मल्लिनाथी केली आहे. पण ती या स्थळीं केवळ अप्रस्तुत आहे. महाराष्ट्रशब्दकोशकारांनीं वाई= वायु हा जो अर्थ दिला आहे तो राजवाड्यांच्या ह्या टीपेच्या आधारेंच दिला असेल. पण त्यांनीं वाई हा शब्द **स्त्रीलिंगी** सांगितला आहे! ह्या स्त्रीलिंगास त्यांनी एखादें अवतरण देणें अवश्य होतें. त्याचे अभावीं वायु ह्या अर्थाचा वाई शब्द स्त्रीलिंगी आहे त्यावर भरंवसा ठेववत नाहीं.

ह्या काव्यांतील एक विशेष पद्धति येथें ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. हा कवि वरल्या ओवींत जी गोष्ट वार्णितो तीच खालच्या ओवींत पुन: निराळ्या शब्दांनीं, पर्यायानें किंवा परिणामरूपानें वर्णितो. शाहिरी वाङ्मयांतही असा प्रकार आढळतो. येथें वरील ओवींत "( बाणासुरें ) तें पाष वाजौनी (ईश्वरू) रीझवीला" हें वाक्य आहे. याचा अर्थ "वाइतां तवां देवो संतोषला" अशा प्रकारें कवीनें परिणामरूपानें पुन: वर्णिला आहे. कित्येक दुर्बोध स्थलांचा अर्थ उलगडण्यास कवीची ही दुहेरी वर्णन करण्याची रीत उपयोगी पडते असें पुढेंही अनेक स्थळीं दिसून येईल.

( ४ ) उद्यो भास्करू चोषडा । कापुरें सहितु घेतला वीडा ।
मुषीं फोडी हातीं पाणें । मग ते नीगाली झडझडां ॥ २१ – ३५

राजवाडे यांनीं पाणें=उदकपात्र असा अर्थ दिला आहे. त्यावरून ह्या ओंवींत उषेनें घेतलेल्या पूजासाहित्याचें वर्णन आहे अशी त्यांची कल्पना झालेली दिसते. अर्थात् दुसऱ्या चरणांतील कापूरसाहित विडा–कापूरविडा हाही देवीच्या पूजेसाठींच ते समजत असावे. पण मग हा कापूरविडा आणि उदकपात्र यांचे मध्यंतरीं आलेल्या **मुखीं फोडी** याचा अर्थ 'तोंडांत विड्याची (?) फोड' असा जो त्यांनीं केला आहे तो कसा समर्पक होईल ? दोन पूजाद्रव्यांचे मध्यंतरी तोंडांत सुपारी टाकल्याचें वर्णन जमत नाहीं म्हणून येथें पूजासाहित्य कल्पिणेंच युक्त नाहीं. उशीर होईल–ऊन होईल त्यानें तूं कोमेजशील वगैरे सांगून चित्ररेखेनें उषेला निघण्याची घाई केल्याचें वर्णन वरच आहे. चित्ररेखेचें वचन मान्य करून उषेनें निघण्याची तयारी लगबगीनें कशी केली त्याचें हें वर्णन आहे. तिनें निघतां निघतां कापूरविडा–त्रयोदशगुणी विडा खाल्ला, पण तो कसा ? तर चालतां चालतां. मुखीं फोडी ( तोंडांत सुपारीची खांडें टाकलीं आणि ) हातीं पानें=हातांत ( चुना वगैरे लावण्यास ) पानें घेतलीं आणि ती सत्वर निघाली. अशा प्रकारें हें उषेच्या लगबगीच्या तयारीचेंच वर्णन आहे, पूजासाहित्याचें नव्हे. शिवाय पूजासाहित्य तिला स्वतःला आपल्या हातीं घेण्याचें काय कारण होतें ? तें काम दासींनीं केलें असेलच. देवीच्या पूजनास ( बहुधा दर्शनास ) जावयाचें त्या वेळी विडा खाल्ल्याचें वर्णन अप्रस्तुत–अनुचित होय असें फार तर म्हणतां येईल. पण येथील शब्दार्थ स्पष्ट आहे. पाणें=पानें ( विड्याचीं ), उदकपात्र नव्हे.

( ५ ) षडी पाची हिंगुळ अळीता । नीळी मनसळि गोदंतां ॥ २८–१४ ॥

येथें राजवाडे यांस पाची हें एक रंगद्रव्य असावें असें वाटलें आहे पण तें बरोबर नाहीं. पाची खडी=पांच प्रकारची खडी. हे पांच प्रकार म्हणजे खडीच्या रंगाची पांच द्रव्यें पुढें सांगितलीं आहेत. १ हिंगूळ, २ अळिता ( लाखेचा रंग ), ३ नीळ, ४ मनशीळ आणि ५ गोदंता म्हणजे पळसाच्या फुलांचा केशरी रंग. पाची हा एक पदार्थ असावा असें राजवाड्यांस कां भासलें न कळे.

( ६ ) ऐक म्हणती न घला घावो । ऐक म्हणती हीरवा धरा ॥४८–३९॥

अनिरुद्धावर घाव घालूं नका म्हणजे त्यास जखमी करूं नका हाच आशय '**हीरवा धरा**' ह्या शब्दांतून व्यक्त झाला पाहिजे. म्हणून हिरवा=अक्षत असा अर्थ येथें दिसतो. पुढें ६५३ व्या ओवींत ह्याच अर्थानें हा शब्द आला आहे. –ह्रीकु–हीरऊ– हीरवा ( लज्जायुक्त ) अशा प्रकारें व्युत्पत्ति व अर्थ राजवाडे देतात. पण तो वरील दोनही स्थळीं समर्पक वाटत नाहीं.

(७) रणी नव्हे धीरु। साणा हा सत्त्वाचा प्राकर्मु ॥५४–६०८॥

रणांत पराक्रमालाच खरें महत्व आहे. वय लहान कीं थोर याला कांहीं महत्व नाहीं. (येथें कांहीं चाड नाहीं वयाची). अशा प्रकारचें वर्णन येथें कवि करीत आहे हें स्पष्ट आहे. वास्तव धीरुसाणा=थोरलहान असाच अर्थ आहे. पण धीरु शब्दानें कांहीं थोर वय कळत नाहीं. तेव्हां **धीरु** याचे स्थानी **थोरु** असा मूळ पाठ असावा. तसेंच थोरुसाना हे शब्द येथें अर्थदृष्टीनें निकटवर्ती असल्यानें ते एकाच चरणांत असावे. तसें घेत-ल्याने **रणीं नव्हे थोरुसाणा। हा सत्त्वाचा प्राकर्मु** ॥ अशी ही ओवी होईल आणि तेणेकरून दोन्ही चरण समप्रमाण लांबीचे होतील. या काव्यांत कांहीं चरण अर्धे, पाऊण, तर कांहीं सवापट, दीडपट लांब असा विचित्र प्रकार असल्याचें राजवाडे यांनीं वर्णिलें आहे. पण बऱ्याच ठिकाणीं हा दोष कवीचा नसून नकलकारानें भलत्याच ठिकाणीं चरणरेषा दिल्यामुळें उत्पन्न झाला आहे असें ह्या उदाहरणावरून म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. जानपद ओवीच्या चरणांत १२, १४ किंवा १६ मात्रा असतात. अक्षरें कमीअधिक असल्यास ऱ्हस्वाक्षरांचा दीर्घ किंवा दीर्घाक्षरांचा ऱ्हस्व उच्चार करून, तसेंच एकदोन मात्रा सूर लांबवून किंवा अक्षरांतील अकार गद्याप्रमाणें निभृत करून ही मात्रांची संख्या साधिली जाते. येथें कांहीं केवळ अक्षरें मोजून चरणाची लांबी न्यूनाधिक ठरत नाहीं. तर जानपद ओवीच्या चालीवर चरण म्हणतां येतो कीं नाहीं हें पाहून ठरतें. अशा तऱ्हेनें परीक्षण केल्यास या काव्यांत अनियमित लांबीचे चरण फारसे नाहींत व जे आहेत ते नकलकाराच्या दुर्लक्षामुळें तसे झाले असून अल्पशा फेरफारानें सुधारून घेतां येण्याजोगे आहेत असेंच आढळेल.

(८) घावो पडतां बाणावरी। तवं आड घातलें आणिकी वीरीं।
अढाउकरी लोटूनी नेला। काठीचीये मानेवरी ॥ ५४–६१६ ॥

येथें पडतां हें कालवाचक मागें असल्यामुळें द्वितीय चरणारंभींचा तंव हा शब्द अनवश्यकच नव्हे तर अनुचितही आहे. शिवाय त्यानें द्वितीय चरणाची लांबी प्रमाणाबाहेर वाढली आहे. तो शब्द गाळल्यानें वाक्यांतील दोष जातो व वृत्तांतीलहि दोष जातो. असा हा उभयविध दोष उत्पन्न करणारा **तंव** शब्द मूळ कवीनें योजला नसावा; तो कोणा नकलकारानें पदरचा घातला असावा हेंच संभवनीय वाटतें.

या ओवीचे उत्तरार्धांतील एक आढाउकर म्हणजे sappers असें राजवाडे यांनीं म्हटलें आहे. आणि महाराष्ट्र–शब्दकोशकारांनीं याचे पुढें धाव मारून अढाउकर म्हणजे सैन्यांतील परिचारक, ॲम्ब्यूलन्समधील माणूस असा अर्थ दिला आहे! पण पौराणिक युद्धांचे काळीं आजच्यासारखीं लष्करी हॉस्पिटलें व ॲम्ब्यूलन्सची व्यवस्था असती तर अभिमन्यु–दुर्योधनांसारखे प्रमुख वीर प्राणोत्क्रमणापर्यंत रणांगणांतच विवळत कां पडले असते?

तें असो; पण येथें बाणासुरास अजून नुसता ओरखडाहि निघाला नव्हता; त्याच्या शरांनीं विद्ध झालेला अनिरुद्ध त्वेषानें अर्गला उचलून त्यावर घाव घालणार; तोंच अढाउकर म्हणजे आडहत्यारी वीर मध्यें घुसून त्यांनीं तो घाव आपल्या काठ्यांच्या टोकावर घेऊन मागें परतविला व बाणास वांचविलें. **काठींचिये मानेवरी** म्हणजे काठीच्या वरील शेवटानें. राजवाडे यांनीं काठी म्हणजे तिरडी हा अर्थ कोठून आणला कोणास ठाऊक. त्यांनीं दिलेला मान=क्षेत्र हाहि अर्थ युक्त नाहीं. येथें **मानेवरी** यांतील ए-कारावरून हा शब्द स्त्रीलिंगी ठरतो. आणि प्रमाण, क्षेत्र असा अर्थ होण्यास मान शब्द नपुंसकलिंगी हवा, तसा तो येथें नाहीं. एवंच काठी = तिरडी, तिरडी = स्ट्रेचर आणि म्हणून काठीवाले आडहत्यारी = ॲम्ब्यूलन्समधील परिचारक!! हा पराचा कावळा कोशकार केवळ टीपांवर न विसंबतां वरील मूळ पाहते, तर न होता.

( ९ ) मग होउनु सुसुबाळु । काई बोलीला माहांकाळु ॥ ६२–७०९॥

सु + अश्रूपहत = स्वश्रूपहत = सुसुवाड = सुसुबाल अशी व्युत्पत्ति राजवाडे देतात. पण तिनें निष्पन्न होणारा अर्थ येथें प्रसंगोचित नाहीं. करूणारसानें बाण कसा उचंबळला याचें यथास्थित वर्णन यापूर्वींच होऊन गेलें आहे. आतां तें भरतें ओसरून त्याचें मन स्थिर होण्याची वेळ आलेली आहे; अशा वेळचें वर्णन प्रस्तुत ओवींत असल्यामुळें सुसुबाळु होणें म्हणजे सुस्थिरचित्त होणें असा अर्थ येथें प्रसंगोचित होणार आहे. सुस्वबल–सुसुबाल अशी ही व्युत्पत्ति करितां येईल. सुसंबळ ( = स्वबलयुक्त ) हा शब्द महानुभाव वाङ्मयांत येणारा म्हणून कोशकार देतात, त्याशीं सुसुबाल शब्दाचा संबंध असावासें वाटतें.

( १० ) बैसला यादवकुळटीळकु । कुमरवर्गा साटी लंक्षु ।
तेतुल्याचीया भार्या । आलीया मातेतें संबोधु ॥६४–७२६॥

दुसऱ्या चरणांत कृष्णकुमारांची संख्या सांगितली असली पाहिजे असें पुढील 'तेतुल्यांचीया' ह्या पदावरून ठरतें. शिवाय प्रस्तुत ओवीच्या पूर्वीच्याच ओवीचे अन्त्य चरणांतील ( म्हणजे "कुमरां येकु लक्षु साटी सहश्र" यांतील ) कुमर, साटी व लक्षु हे शब्द प्रस्तुत ओवींत आले आहेत. सहस्र हा शब्द मात्र गळला आहे. वर्गा हा शब्द नसता व त्याऐवजीं **साटी** याचेपुढे सहस्र हा शब्द असता तर इष्ट अर्थ झाला असता. अर्थात् येथें लेखनांत कांहीं अपपाठ पडल्यानें नीट उलगडा होत नसला तरी येथें कृष्णकुमारांची 'एक लक्ष साठ हजार' ही संख्या सांगण्याची विवक्षा सुस्पष्टच आहे. म्हणून राजवाडे यांनी श्लक्ष्णः=लंक्षु, असें जें निर्वचन केलें आहे तें प्रस्तुत स्थळीं लागू पडत नाहीं. लंक्षु = श्लक्ष्ण म्हणजे नाजूक, सुंदर असा अर्थ क्षणभर मान्य केला तरी **साटी** ह्या पदाची वाट काय हा प्रश्न राहतोच. म्हणून येथें लंक्षु = लक्षु = एक लक्ष हाच अर्थ घेणें प्राप्त होय. **ल** वरील टिंब हें आगांतुक आहे. अशीं आगांतुक टिंबें ह्या काव्यांत शेकडों स्थळीं लेखकानें दिलेलीं आहेत.

( ११ ) अनुर्धाचीया माया रखुमावंतीया । मोकलीली धाया ॥ ६४-७२७॥

अनिरुद्धाच्या मातेचें म्हणजे प्रद्युम्नाच्या पत्नीचें नांव मायावती. रखुमावंती नव्हे. अर्थात् नकलकाराचे हातून येथें अपपाठ पडला आहे हें उघड आहे. शिवाय पहिला चरण प्रमाणाहून लांब तर दुसरा चरण तोकडा झाला आहे. म्हणजे येथें चरणरेषेचें स्थानही चुकलें आहे. हा दोष पोथीच्या लेखकाचा आहे, कवीचा नव्हे. ही ओवी मूळची पुढीलप्रमाणें असावी:—

अनिरुद्धाचीया माया । मायावती मोकली धाया ।

किंवा अनुर्धाचीया माया । मायावंतिया मोकलीली धाया ।

( १२ ) ज्याचे घरींचीं षडाणी । दळ त्रीपण क्षौणी ॥ ७२-८१२ ॥

येथें राजवाडे यांनीं षडाणी = षडाननसंबंधी असा अर्थ दिला आहे. ष हा ख आहे इकडे दुर्लक्ष झाल्यानें त्यांनीं हा अर्थ दिलेला दिसतो. येथें बाणाच्या साह्यकर्त्यांस वगळून खुद्द त्याचे घरची खास सेना — हुजुरात — किती मोठी होती तें कवीनें सांगितलें आहे. "बाणाच्या कैवारा ... येतील ईश्वराचे कुमर" वगैरे वर्णन पुढें यावयाचें आहे. अर्थात् येथें षडाननाचा किंवा त्याच्या सेनेचा कांहीं संबंध नाहीं. खडाणी = कजाख, जय्यत, रणशूर, अतिक्रूर. खड्ग, = खांडें, खांडेकर = खड्गधर या खड्ग शब्दावरून खडाणी शब्द आला असावा.

( १३ ) तेयासी बाणलीया पाखरा । सनात बंद असीवारां ॥ ७३-८२३॥

बाणलिया आणि पाखरा ह्या शब्दांवर राजवाड्यांनीं प्रश्नचिन्हें केलीं आहेत. पाखर म्हणजे हत्ती घोडे यांवरील झूल किंवा लोखंडी चिलखत. बाणलीया = बाणल्या, घातल्या. हे शब्द जुन्या पद्यांत येणारेच आहेत.

सनात ह्या शब्दावरही राजवाडे यांनीं प्रश्नचिन्ह केलें आहे. येथें सनातबंध हा एक शब्द: असावा. सन्नाह = कवच. सन्नद्ध = कवच घालून सज्ज झालें. सन्नाहबद्ध किंवा सन्नद्ध याचा अपभ्रंश सनातबंध. सनातबंध असिवार = कवचें चढविलेले स्वार किंवा कवचें घातलेले घोडे.

असीवार ह्याची व्युत्पत्ती असि + स्वार किंवा असि + वार अशीं शब्दकोशकार देतात. पण असीवार ( स्वार ) शब्दार्शीं असी = तरवार ह्या शब्दाचा कांहीं संबंध दिसत नाहीं. राजवाडे अश्ववार=असीवार=स्वार म्हणतात; पण अश्ववार याचा अर्थ घोड्यांचा समुदाय. असिवार ( स्वार ) ह्या शब्दांत जसा असीचा कांहीं संबंध नाहीं तसाच समुदायवाचक वार शब्दाचाही कांहीं संबंध दिसत नाहीं. यापेक्षां आश्विवर—असिवार ( अश्विन्=स्वार, वर=श्रेष्ठ ) ही व्युत्पत्ति युक्त वाटते.

प्रस्तुत ओवींत असिवार याचा अर्थ घोड्यांचा समुदाय असाही घेतां येईल आणि हत्तींच्या जोडीस स्वार न घेतां घोडे घेणेंच अधिक सयुक्तिकही होईल. तसा अर्थ घेतल्यास अश्ववार किंवा अश्ववर असा मूळ शब्द धरतां येईल. पण मग 'स्वार' हा जो राजवाड्यांनीं अर्थ दिला आहे तो घेतां येणार नाहीं.

(१४) पुढीली अणीया भाले। जवळी पांच पांच सेले।
आडासनी दोनी दोनी षगें। मोजे घंसनी पातले॥७३-८२४॥

पुढीली आणि जवळी ह्या दोन स्थलवाचकांचे जोडीनें आलेला अडासनी हा शब्दहि स्थलवाचकच होय. पुढिलीं=पुढील बाजूस; जवळी=डाव्या उजव्या बाजूस; आडासनांत खङ्गे ठेविलेलीं आहेत, यावरून आडासन=कोश, म्यान असा अर्थ दिसतो. अडसनी=आच्छादन, झांकण. याशी आडासनी हा शब्द संगत दिसतो. अर्धासन-अडासन असें निर्वचन राजवाडे करितात. कोशकार त्याचाच अनुवाद करितात आणि शिवाय **कमर** असा अर्थ देतात. पण अर्धासन ह्या मूळांतून कमर हा अर्थ कसा उत्पन्न होईल हा प्रश्नच आहे.

सेला (शिली)=बाण हा अर्थ राजवाडे यांनी दिला असतांही हा सेला शब्द कोशांत कसा घेतला गेला नाहीं न कळे.

वीरांजवळ पांच पांच बाण फार कमी वाटतात. कवीनें येथें 'पांचपांचसे सेले" असें वर्णिलें असेल. **से** हें एकच अक्षर दोनदां जवळजवळ आल्यानें त्यांतले एक लेखकाचे हातून गळलें असेल. असा दोष हस्तलिखितांत पुष्कळ स्थळीं झालेला आढळतो. प्रस्तुत उदाहरणांतही "आणीक के उती" याचे जागीं 'आणी के उती' (२१-२७) "तांडव वनासि" याचे जागीं 'तांड वनासि' (७-६५) अशी ह्या प्रकारचीं अनेक स्थळें आहेत.

घसनी=युद्ध असा अर्थ राजवाडे देतात; पण युद्ध अजून फार दूर आहे. आतां वीर नुसते द्वारका-नगरीबाहेर पडत आहेत त्यांचें हें वर्णन आहे. ते शोणितापुरास पोचतील तेव्हां युद्धाचा प्रसंग येणार. येथे घसनी-घर्षणी घर्षणानें, गर्दीनें हाच अर्थ युक्त होय.

(१५) वज्रा इंद्राचेया चुकले। अती सपक्षे वांचले॥ ७३-८२६॥

येथें राजवाडे 'अतिवांचले' एवढें एक क्रियापद धरितात व तें वैदिक पद्धतीप्रमाणें फोडून या क्रियापदाचे पोटांत **सपक्षे** हा शब्द कवीनें घुसविला आहे असें प्रतिपादितात. या प्रतिपादनांत तर्कशक्ति दिसत असली तरी तसें मानणें येथें आवश्यक किंवा युक्तही नाहीं. ह्या पोथीचा लेखक ऱ्हस्वाचें दीर्घ, दीर्घाचें ऱ्हस्व, सानुस्वाराचें निरनुस्वार आणि निरनुस्वार हवे तेथें सानुस्वार, असें मनसोक्त लिहितो.

यास्तव ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार अर्थानुरोधानें हवें असतील तसे द्यावे लागतात, हें राजवाडे यांनींहि मान्य केलेंच आहे. त्याप्रमाणें येथें **अती** याचे स्थानीं अंती असा कवीचा मूळ पाठ असला पाहिजे व तो धरल्यानें येथें कार्यभाग होतो. क्रियापद फोडण्याची कांहीं आवश्यकता पडत नाहीं.

( १६ ) बहुताती वराचे यादव। जुंझा लागौनि उनंत ॥७३–८२७॥

बहुताती यावर **बहुतिथ** आणि वराचे यावर **वरीयान**–श्रेष्ठ, अशा टीपा राजवाड्यांनीं दिल्या आहेत. शब्दकोशकारांनी यांपैकीं 'वराचे (वि.) श्रेष्ठ' अशाप्रकारें ही टीप उतरून घेतली असून उदाहरणार्थ हेंच अवतरण दिलें आहे. बहुताती–बहुतिथ टीप मात्र उतरून घेतली नाहीं असा पंक्तिप्रपंच कां केला न कळे. वराचे हें विशेषण कोशांत यावयाचें तर एकवचनीं **वराचा** ह्या स्वरूपांततरी यावयास पाहिजे होतें. कोशावरून वराचे हेंच एकवचन ठरतें!

संस्कृतांत बहुतिथ (=बहुत) हा शब्द असला तरी तो क्वचित् येणारा आहे. म्हणूनच तो आपट्यांच्या कोशांत दिला नाहीं. असल्या ह्या अप्रसिद्ध शब्दाचा **बहुताती** असा अपभ्रंश मराठींत रूढ असणें हें संभवनीय वाटत नाहीं आणि हा शब्द धरल्याविना गत्यंतर नाहीं असाही प्रकार येथें नाहीं.

**बहुताती वराचे** यादव याचे जागीं **बहुता तीवराचे** यादव असा पदच्छेद येथें हवा आहे. तिवरा (तीव्रत्व)= अभिमान, आढ्यता, वीरश्री. निरंजनमाधवानेंही हा शब्द योजिला आहे. "स्वरूपाच्या दर्पे बहुत चढला त्यासि तिवरा" या त्याच्या चरणांत बहुत आणि तिवरा हे दोन्ही शब्द आले आहेत हें लक्षणीय आहे. तिवरा याचींच दुसरीं रूपें तवर व तऊर हीं जुन्या काव्यांत येतात. तोरा हा शब्दही यांपासूनच झाला असावा. असा हा तिवरा शब्द ध्यानीं न आल्यानें पदच्छेद चुकून अर्थाचा अनर्थ झाला आणि विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे **वराचे** असें एकारान्त विशेषण शब्दकोशकारांनीं दिलें. मराठींत असें एकारान्त विशेषण असतें कीं नाहीं इकडेहि त्यांचें लक्ष गेलें नाहीं.

( १७ ) षांबटंके आंदोळत । पडवळ काठीया डोलत ॥
सारथी आपुडीत वागारे । गजर्वे घोडें वासीपत ॥ ७२८ ॥

रथ बाहेर कसे पडले याचें हें वर्णन आहे. खांबटके (खांबटे) म्हणजे रथाचे लहान लहान खांब, ते रथगतीमुळें आंदोळत होते, पडवळकाठिया म्हणजे ध्वजस्तंभ, ते डोलत होते, सारथी लगाम आखडून धरीत होते तरी घोडे गजबजाटामुळें (गजरें) थैमान करीत होते; असें हें सुंदर वर्णन आहे.

पटोल ( सं. ) = वस्त्रप्रकार. पटोल–पडवळ=वस्त्र, ध्वजाचें वस्त्र व म्हणून पडवळकाठिया=ध्वजस्तंभ. ध्वजस्तंभ ह्या अर्थानें पडवळकाठिया हा शब्द अन्यत्रही आलेला आहे. "पुढां डोलताती पडवळ काठिया"–शिशु. व. १०३४. अर्थात् राजवाडे यांनीं पडवळ ह्या शब्दाचा तंबू हा टीपेंत दिलेला अर्थ येथें सर्वस्वी गैरलागू आहे. खांचटंका=तरवारविशेष, हा त्यांचा अर्थही येथें असाच गैरलागू आहे. खांचटका ह्यांतील ट वर लेखकानें उगाच टिंब दिलें आहे. त्या टिंबामुळें राजवाड्यांस टंक म्हणजे तरवार हा अर्थ येथें असल्याचें भासलें. पण आंदोलत हा शब्दही तरवारीस समर्पक होत नाहीं आणि हें सारें रथांच्या निर्गमनाचें वर्णन असल्यामुळें त्यांत तरवार परजण्याचा कांहीं संबंधही येत नाहीं.

( १८ ) सुटला प्रतापाचा वारा । तेणें उधळतोय धुळौरा ।
घडघडीत चक्रवाटी । तेची मेघांचे गजर ॥ ७४–८३१ ॥

येथें चक्रवाटीच्या घडघडाटावर मेघगर्जनेचें रूपक केलें आहे. अर्थात् चक्रवाटी ही येथें प्रस्तुत म्हणजे उपमेय आहे म्हणून चक्रवाटी=रथचक्रांचा समूह हाच अर्थ येथें आहे. राजवाडे यांनीं दिलेला चक्रवात=वावटळ हा अर्थ घेतल्यास चक्रवाटी व मेघ दोन्ही अप्रस्तुत होतात म्हणून तो अर्थ अयुक्त आहे हें उघड होतें.

प्रतापावर वाऱ्याचें रूपक आहे म्हणून प्रताप=पराक्रम. प्रतापाचा वारा म्हणजे अत्यंत उष्ण वारा हा टीपेंतील अर्थही उपमेय राहात नसल्यामुळें असाच चुकीचा आहे.

( १९ ) ऐती सरजालें वरीसत । वाहाती असुधाचीया सरिता ।
तेया मीळतीं रणसागरीं । बुडती कुंजरपर्वत ॥ ७४–८३२ ॥
म्हणौनु कल्पांतमेघ ऐसे । यादवांचें सैन्य दीसे ॥

असुद्ध ( रक्त ) हें जल, रक्तप्रवाह ह्या नद्या, रणांगण हा सागर, कुंजर हे पर्वत असें हें दीर्घ रूपक आहे. त्याशीं सुसंगत होण्यास प्रथम चरणांतही रूपकच असलें पाहिजे. म्हणून शरजाल हाच वर्षाव म्हणजे पर्जन्यधारा असाच अर्थ येथें आहे. राजवाडे यांनीं शरज्जाल=सरजाल=पावसाचें आडंबर असा अर्थ दिला आहे. पण त्यांत उपमेय कांहींच उरत नाहीं म्हणून तो अर्थ अयुक्त होय. शरजाल=सरजाल =शरसमूह असाच येथील अर्थ आहे.

( २० ) ओवी ८३४ ते ८४२ पर्यंत रथांवर नौकांची कल्पना केली आहे व ती अपन्हुति, उत्प्रेक्षा व रूपक यांनीं सजविली आहे. मात्र येथील कांही शब्दांचे अर्थ समजत नाहींत. यांत कांही अपपाठही असण्याचा संभव आहे. पण अन्य हस्तलिखितांच्या अभावीं त्यांचा उलगडा होत नाहीं. नाविक शब्दांची माहिती असणाऱ्या चिकित्सकांनीं यांचा विचार अवश्य करावा.

चहुं वारुवांचे पुरुतळ । तेची वरी पडत असे सोळ ।
चुळक्षाळु ते रणसागरीं । रथ चालतां लागे बळ ॥८३५॥

खुरु आणि तळ हे शब्द पृथक् असावे. घोड्यांचे खुर हेच तारवांचे तळ असें रूपक येथें केलें आहे व ते तळ खोल रुतत आहेत असें द्वितीय चरणांत सांगितल्याचें दिसत आहे. वरि पडत असे=वरिपडत असती=मग्न होत आहेत, रुतत आहेत. **सोळ** याचा अर्थ टीपेंत **खोळ** असा दिला आहे तो **खोल** असा असावा. पोथीच्या लेखकानें **ख** बद्दल ष लिहिण्याच्या रीतीप्रमाणें **खोल** चे जागीं **षोल** व यमकार्थ **षोळ** लिहावयाचें पण षकाराबद्दल सकार पडून सोळ असें लेखन झालें असावें.

चुलक्षाळु याचा अर्थ चिखल ढवळणारे असा करून तें टीपेंत रथाचें विशेषण केलें आहे. यांत अर्थाची व अन्वयाचीही फार ओढाताण होते. त्यापेक्षां

चुलुक (सं) चिखल, यावरून चुलुकालु–चुलुक्षालु=चिखलानें व्याप्त हें विशेषण निकटच्या रणसागरास चांगलें साजतें व अर्थही ओढूनताणून बसवावा लागत नाहीं. चुलुक्षालु हा शब्द महाराष्ट्रशब्दकोशांत कां दिला नाहीं न कळे.

रथ चालतां=रथ चालविण्यास. चलणे=हालणें; चाळणें=हालविणें, चालविणें.

(२१) अयाघडीता तोचि विंदानी । मकरतोंड तेची आणी ।
लाळ गळे वारुवांची । जेवी गोमतीचें सांडे पाणी ॥ ८३६ ॥

यांतील पहिल्या चरणांतील **अयाघडीता** व **विंदाणी** यांचा अर्थ लागत नाहीं, यांतील पहिला रथाकडे व दुसरा नौकेकडे लावला पाहिजे. व दोहोंची तुलना करण्यास त्यांत कांहीं साम्य असलें पाहिजे.

रथाचें **मकरतोंड** म्हणजे दांड्यांच्या पुढलें टोंक तीच तारवाची **अणी** म्हणजे **नाळ** हें रूपक सुंदर आहे. टीपेंत **मकरतोंड** आणि **आणि** यांचे अर्थाची अदलाबदल झाली आहे; ती कदाचित् नजरचूक असेल.

घोड्याच्या तोंडांतून गळणाऱ्या लाळेस सांडणाऱ्या गोमतीच्या पाण्याची उपमा दिली आहे. हें गोमतीचें पाणी म्हणजे तारवांत झिरपणारें जें पाणी वरचेवर काढून टाकावें लागतें तें. यास **गमत** म्हणतात. येथें **गोमतीचें** पाणी=तारवांतील **गमत**.

मूळचा पाठ **गमताचें पाणी** असा असेल. पोथीच्या लेखकास त्याचा अर्थ न कळल्यामुळें त्यानें **गोमतीचें** अशी सुधारणा (!) केली असेल. गोमती नदीचा येथें कांहीं संबंध नाहीं. राजवाड्यांनीं गोमती शब्दावर टीप दिली नाहीं व प्रश्नचिन्हहि केलें नाहीं.

(२२) पुढील ८३७ व्या ओवींत **जावें** आणि **भुषण** हे शब्दही अनुक्रमें रथ व तारूं यांसंबंधीं आहेत. जावें = जुवाशीं असा अर्थ कदाचित् असेल. **भूषण** तारवासंबंधीं असून तें हातांत धरल्याचें वर्णिलें आहे. यावरून तें सुकाणूं असावें. **मूर्त** ही उपमा वागऱ्यांस म्हणजे लगामांस दिलेली आहे, यावरून मूर्त म्हणजे शिडाच्या दोऱ्या असतील. ह्या केवळ कल्पना सुचविल्या आहेत इतकेंच. या शब्दांचा अर्थनिर्णय साधार झाला पाहिजे. राजवाडे यांनीं **जावें, भुषण** व **मूर्त** ह्या तिन्ही शब्दांवर अर्थनिर्णायक टीपा दिल्या नाहींत व प्रश्नचिन्हेंहि केलीं नाहींत.

(२३) नीगे लाठाचेनीं सवायें । तरी वैंकुंठ दीपा जाये ॥८३९॥

वरील रूपकानुसार तरी ... रथ; अन्यद्वीप... वैकुंठ; सुवायु ... लाठू (=धैर्य). नौकेला प्रेरणा जशी सुवायूनें मिळते तशी रथाला प्रेरणा कशानें मिळते हें सांगणें असतां कवीनें **लाठाचेनी** हा शब्द योजिला आहे. येथें कदाचित् लाठुवेनि असा मूळ पाठ असेल. लाठू, लाठेपणा (=धैर्य) हे शब्द जुन्या काव्यांतून येतात. पुढें ८४१ व्या ओवींत लाठाचा सुवायु याच्या विरूद्ध अर्थानें **भेडपणाचें वावदळ** घेतलें आहे, त्यावरूनही **लाठाचेनी** म्हणजे धैर्याच्या, हाच अर्थ ठरतो. राजवाडे लाठाचेनि= लाटांच्या असा अर्थ देतात. तो घेतल्यास लाटांचा संबंध सुवायु-प्रमाणें तारवांशींच असल्यानें हे दोन्ही शब्द अप्रस्तुतांकडे जाऊन प्रस्तुत रथाकडे कांहींच उरत नाहीं व त्यामुळें रूपक होत नाहीं; म्हणून राजवाडे यांनीं दिलेला लाटा हा अर्थ अयुक्त होय.

(२४) ऐसें टाकी लागें वेगें । तरी तेया हातीहुनी लागे ।
अस्टमासिधी होती दासी । येरी संख्या कवण सावें ॥८४०॥
भेडपणाचें वावदळ उठी । रौरवाचा वळसा दाटी ।
तरी बुडाला माझारीची । द्रीष्टी न पडेंची वैकुंठीं ॥८४१॥

**ऐसें = असें धैर्य, मागल्या ओवींत वर्णिलेलें लाठेपण; नौकेच्या दृष्टीनें सुवायु.**

**टाकी = ठाकी, मिळवी, साधी, आंगीं धरी.**
**लागेवेगें = त्वरेनें.**

वळसा = भोवरा
वळसां = भोवऱ्यांत.
दाटी = दाटतो, अडकतो.

भेडपणाचें वावदळ उठल्यास होणारा परिणाम ८४१ व्या ओवींत वर्णिला आहे. यावरून तिचे मागील दोन ओव्यांत धैर्याचा सुवासु झाल्यास होणारा परिणाम वर्णिला असला पाहिजे हें उघड आहे. "तेया हातीं...लागे" यांत हातीं आणि लागे यांच्या मध्यें हातीं काय लागतें याचा वाचक शब्द असला पाहिजे. पण तो कोणता हें निश्चित होत नाहीं. येथें कांहीं पाठांतर असेल काय याचा चिकित्सकांनीं निर्णय करावा.

राजवाडे **टाकी** ही षष्ठी म्हणतात तेव्हां त्यांनीं ठाकी=योग्यता हा अर्थ धरला कीं काय न कळे. पण ही पष्ठी धरल्यास प्रथम चरणांत क्रियापद न राहून अपूर्णता येते. हातीहुनी=हातून अशी टीप ते देतात; पण तिच्या योगानें लागे काय याचा कांहीं उलगडा होत नाहीं.

(२५) सूर्यांचेनी दीपें। वसीस्टाची काठी तपें ॥ ७७–८७० ॥

सूर्यांच्या इतक्या तेजानें वसिष्ठाची शाटी तळपत होती ही कथा प्रसिद्धच आहे. तिचाच उल्लेख येथें आहे. अर्थात् **काठी** हा अपपाठ होय. येथें शाटी- छाटी असा मूळचा पाठ असला पाहिजे, हें स्पष्ट आहे. असें असतां राजवाड्यांनीं काठी= शरीरयष्टि असा अर्थ दिला आहे आणि आश्चर्याची गोष्ट अशीं कीं महाराष्ट्र-शब्दकोशकारांनीं तो अर्थ व त्यास हेंच अवतरण आंधळेपणानें उतरून घेतलें आहे! आतां सामान्यजन हा अर्थ खरा मानणार आणि त्यास कोशाचें हेंच प्रमाण पुढें करणार!

(२६) तैसेंची करील पणे। नैरुत्येंसी जुझो म्हणे।
तो निर्जीवा प्रेतवाहानु। सवयां दीसे कारीसवाणे ॥ ९५–१०६८ ॥

नैरुत्य= नैर्ऋत= राक्षस. हा नैर्ऋत्य दिशेचा स्वामी. राक्षसास कुणपाशन = प्रेतें खाणारा असें नांव आहे. येथेंही उत्तरार्धात तसेंच वर्णन आहे. प्रेतवाहन = प्रेत उचलून नेणारा, लक्षणेनें खाणारा. पण राजवाडे नैरुत्य शब्दाचा अर्थ **रुद्र** असा देतात! कारिसवाणें = किळसवाणें. हा अर्थ कोशकार देत नाहींत. ते केविलवाणें हा एकच अर्थ देतात; पण तो येथें लागू पडत नाहीं.

(२७) तेणें परवंटा वरीयां अडस। बळकट दाटीली कास।
पीळीव नागबंध पोवीलें। सुरु गुरुळे भूमीसरसा ॥ १०८३ ॥

बाणासुर सोनसळा कसा नेसला त्याचें हें वर्णन आहे.

अडस=अडच, घट्ट. हाच अर्थ बळकट हा आणखी एक शब्द योजून स्पष्ट केला आहे. टीपेंतलि अडस= आटोपशीर हा अर्थ युक्त नाहीं. आटोपशीर कास म्हणजे कशी कास? लक्षणेनें सोनसळा, आटोपशीर म्हणावा तर तो भूमीसरसा रुळत असल्याचें वर्णन पुढेंच आहे.

नागबंध= कमरेंतलि गोफासारखा अलंकार-ह्याच अर्थानें हा शब्द बहुत स्थळीं आला आहे. **बंध** ह्या शब्दावरून तो बंदासारखा बारीक लांबट असा कांहीं तरी पदार्थ असणार, सुपारीसारखा वाटोळा घट्ट गोळा नसणार, हें उघड आहे. पण राजवाडे यांनीं सोंगटी, सुपारी असा अर्थ दिला आहे व महाराष्ट्रशब्दकोशकारांनीं तो डोळे मिटून या अवतरणासह उतरून घेतला आहे!

शिवाय बाणासारख्या वीरास सोनसळा सुटूं नये म्हणून लहान मुलाप्रमाणें कडोसरीस सुपाऱ्या खोवाव्या लागाव्या हें कांहीं चांगलेंसें वर्णन नव्हे. **पिळीव** हें विशेषणही सोंगटीस किंवा सुपारीस साजत नाहीं. तें गोफासारख्या वस्तूंसच साजतें.

धोतर नेसण्याच्या मराठ्यांच्या विशिष्ट पद्धतीप्रमाणें सोनसळ्याच्याच सोग्यास पीळ देऊन म्हणजे त्याचा पिळीव नागबंध करून तोच कमरेभोवतीं आवळून बांधून त्याचें टोंक खोवल्याचें वर्णन येथें कवीनें केलें असावें. किंवा नागबंध म्हणून असाच एक कमरेभोवतीं बांधण्याचा बंध असेल. तो बंध आहे अर्थात् भरींव वाटोळी सोंगटी नव्हे.

'भूर्मीसरसा' याशीं सुसंगत म्हणून **रुळे** एवढा स्वतंत्र शब्द घेतला पाहिजे हें कोणासही पटेल. सुरुच् (= उत्तम कांतिमान्, झुळझुळीत). सुरुचू सुरुग सुरुगु. सुरुगु आणि रुळे हीं भिन्न पदें असावीं.

(२८) बाणाच्या मुगुटास एक उपमा सुचते ती सांगतो; संतमहंतांनीं चित्त द्यावें; असा उपोद्घात कवीनें केला आहे. यावरून ही उपमा स्वतः कवीस फार आवडलेली दिसते व खरोखरच ती उपमा विशेष सुंदर आहे. पहाः–

बाणु अवघाची सुनीळु। जेवी पर्वतु उदयाचळु।
लोही वा रणवटू माथां। जैसा प्रभातेचा संध्याकाळु॥ १०८८ ॥
त्यावरी भाणु होये प्रगटू। कैसा (तैसा) मीरवला मुगुटू॥

रणवटु=रणपट्ट=शिरस्त्राण. लोहीव=तांब्याच्या रंगाचें, तांबूस रंगाचें किंवा तांब्याचें. रणवटू हा शब्द या काव्यांत आणखी दोन स्थळीं आला आहे.

कां न बंधसी रणवटू। उषा. ६११
माथां होता जो रणवटू। उषा. १३५७.

या स्थळांवरूनही रणवटू शब्दाचा वर दिलेला अर्थ स्पष्ट होत आहे. पण ह्या व्युत्पत्तीस अनसरून रणवटू म्हणजे रणांत डोक्यास बांधावयाचा पटका असा अर्थ कोणी देतात. पण तो पटका (वस्त्र) असला तरी रणांत उतरतांना डोक्यास बांधावयाचा आहे म्हणजे तो शिरस्त्राणाचेंच कार्य करण्यासाठीं बांधला जाणार हें स्पष्ट आहे "रणवटू **तुटौनि** भूमी पडला" (ओ. १३५७) यांतील तुटौनि ह्या शब्दावरून बाणाचा रणवटू म्हणजे पटका नसून तांब्याचें शिरस्त्राण असावें असें वाटतें. वस्त्र असो वा धातूचें शिरस्त्राण असो येथें रणवटू असाच शब्द आहे, पण येथें छापताना लोही **वारणवटू** माथां असा चुकीचा पदच्छेद केल्यानें राजवाडे यांस **वारणवटू** शब्दावर प्रश्नचिन्ह करण्याचा प्रसंग आला आहे! प्रसंगीं मोठमोठ्यांचीही दिशाभूल कशी होते याचें हें एक उदाहरण आहे.

श्यामलवर्णाचा बाणासुर हा काळसर उदयाचला सारखा, त्याच्या मस्तकींचा ताम्रवर्णाचा रणवट हा अरुणोदयींचा संध्याराग आणि त्यावरील तेजस्वी रत्नखचित मुगूट म्हणजे उदय पावलेला साक्षात् सूर्यच; ही उपमा सुंदर नाहीं असें कोण म्हणेल ?

( २९ ) माहाद्वारापुढें राचे । बहुतु पैसु धरीला आहे ।
तेथें नव थडीयांचे घोडे । वाहाणी लाविती कटारवाहें ॥ १११० ॥
पैसु – पैस = विस्तीर्ण पटांगण.

सैन्याच्या जमावासाठीं नगरांतच राजवाड्याच्या महाद्वारापुढें हें पटांगण राखिलें होतें; असें सरळ वर्णन पूर्वार्धांत आहे. ओवी ११११ मध्यें पैसु शब्द पुनः आला आहे तेथेंही त्याचा हाच अर्थ आहे. राजवाडे "पैंसु=प्रवेश=मार्ग" असा अर्थ देतात तो येथें जमत नाहीं. मोकळी विस्तीर्ण जागा ह्या अर्थाचा पैसु पैस शब्द प्रविश् पासून निघाला नसून प्रसृ पासून निघाला असावा आणि प्रवेश, मार्ग ह्या अर्थाचा पैस शब्द प्रविश् पासून निघाला असावा.

शोणितापुरास एकाएकी यादव सैन्याचा वेढा पडून बाणाचें अपार सैन्य आंत कोंडलें गेलें. तेव्हां दरवाजे एकदम उघडून आंतील सैन्यानें बाहेर घुसून शत्रूची फळी फोडावी अशी मसलत प्रधानानें बाणास सांगितली. तेव्हां

आंगवणेचा टंकेकारी । पुढें दारवठें उघडीलें ॥ १११९ ॥

टंकेकारी=प्रवेश मार्गाचा द्वारपाल, असा अर्थ राजवाडे देतात, त्यास कांहीं व्युत्पत्तीचा आधार दिसत नाहीं. टंक = तरवार, यावरून टंकेकारी= खड्गधारी असा अर्थ होऊं शकेल. पण येथें ट वरील टिंब उगाच पडलेंही असेल. या काव्यांत शेंकडों स्थळीं उगाच टिंबें दिलेलीं आहेत. टका=निशाण, ध्वज. टका हा शब्द जुन्या वाङ्मयांत पुष्कळ स्थळीं आला आहे. त्यावरून टकेकारी=ध्वज धरणारा, सैन्यापुढें चालणारा, निशाण–बारदार असाच अर्थ येथें असावासें वाटतें. यास आणखीही एक कारण आहे. तें असें कीं भिक्षा–भिक्षेकरी, कथा–कथेकरी यात्रा–यात्रेकरू, सेवा–सेवेकरी इत्यादि शब्दांत जसा आकाराचे जागीं एकार होतो तसा गड, मान, शेत इत्यादींतील अकाराचे जागीं एकार होत नाहीं. उदा०–गडकरी, मानकरी, शेतकरी. म्हणून टका शब्दापासून टकेकारी शब्द होईल आणि टंक शब्दावरून टंककारी होईल. टंकेकारी असा एकारयुक्त शब्द **टंक** ह्या अकारान्त शब्दावरून होणार नाहीं.

( ३१ ) तेव्हळी देवां सुटला पळु । तवं पडपळीला नारायेणे ॥ १३४४ ॥
पडखळीला=प्रतिस्खलित आणि नारायेणे=नारायण अशा टीपा दिलेल्या आहेत; यांवरून कृष्ण रोधला गेला असा अर्थ होतो; पण तो अगदी उलटा आहे. येथें

" नारायणें वीरभद्र पडखळिला " असें वर्णन आहे. प्रथम सामान्यपणें विधान करून पुढें लगेच अधिक स्पष्टीकरणानें तेंच सांगण्याची रीति ह्या कवीची आहे. तीस अनुसरून येथेंही पुढें " मदसुदनें वीरभद्रु सुद्रसेनें चक्रे हाला ( हाणिला ) " असें विस्तृत वाक्यांत तेंच वर्णिलें आहे. अर्थात् वरील वाक्यांत नारायण अशी प्रथमा न घेतां नारायणें अशी तृतीयाच घेणें अवश्य होय.

( ३२ ) लाठें यादवांचें कुळ ! कैसें न कळे हरीमेषळ ॥ १३५४ ॥

हरीमेखळ ह्यावर टीपेंत प्रश्नाचिन्ह केलें आहे. येथें **हरिखे खळ** असा मूळ पाठ असावा. बळ खळ, यादवांचें कुळ लाठे म्हणजे बलाढ्य, शूर असें असतां खळ ( त्याशीं लढण्यास ) हरिषे हें कैसें ? न कळे; असा अर्थ जमवितां येईल.

( ३३ ) घृतें वीझवीतां अग्नी । अधिका अधिक लागे गगनीं ।
तैसा पोंचतु दुणावंतु । जाळ नीगती लोचणीं ॥ १३५९ ॥

शरविद्ध झालेल्या बाणासुरास दुप्पट त्वेष चढल्याचें वर्णन येथें अग्नीच्या दाखल्यानें केलें आहे. द्विगुण–दुणा. दुणावला = दुप्पट वाढला, अधिक त्वेषास चढला. टीपेंत दिलेला दुणावत = पीडिलेला हा अर्थ अयुक्त होय हें अग्नीच्या दाखल्यावरून स्पष्टच आहे.

( ३४ ) ऐरु विंधताये षडतर । आंगी उपटत. हाती -सर ॥१३६०॥

हस्तशर = हातीसर असें निर्वचन टीपेंत केलें आहे. हस्तशर हा शरांचा एक नवीनच प्रकार दिसतो. पण तो टीप देणाऱ्यांच्या कल्पनेंतून निघालेला आहे. पौराणिक वाङ्मयांत कोठें आढळत नाहीं. शिवाय हस्तशर याचा अपभ्रंश **हातसर** असा होईल. हातीसर असा ईकारयुक्त होणार नाहीं. येथें वास्तविक हातीं व सर तोडून लिहिलें पाहिजे होतें. उपडत हातीं = उपडतातीं = आदळतात. चुकीच्या पदच्छेदामुळें येथें गोंधळ उडाला आहे.

( ३५ ) जेवीं उदधी वरी अंतरंगु ऐतु । स्वभावें दुमुदुमीतु ।
असुधां भरला रणसागरु । तैसा तिये वेळीं दीसतु ॥१३७२॥

दुमदुमित म्हणजे तट्ट फुगलेला, उचंबळलेला; असा उदधि केव्हां होतो ? त्यास भरती येते तेव्हांच. उदधि स्वभावतः केव्हां उचंबळतो तें " (जेव्हां) वरी अंतरगु एतु " यांत सांगितलें आहे. यावरून येथें अंतरंग म्हणजे चंद्र असा लक्षणेनें अर्थ घ्यावयास पाहिजे. अंतरंग = आत्मीय, शरीरसंबंधी, आप्त असा अर्थ असल्यानें व चंद्र हा समुद्रोत्पन्न असल्यानें तो सागराचा अंतरंग म्हणतां येईलच. येथें प्रद्युम्न हाच रणसागरास भरती आणणारा चंद्र होय. अंतरंगु शब्दावर टीप अवश्य हवी होती.

( ३६ ) क्रौंचा पर्वती भेदीला । जेणें करौनी आडषळा ॥१३८२॥

आडखिळा शब्दावर "अंतर = आड, आडपासून नाम आडकणें" अशी टीप दिली आहे. तीवरून येथील अर्थावर कांहींच प्रकाश पडत नाहीं. आडखिळा=लगोऱ्यांचा ढीग. लगोऱ्यांची उतरंड. ज्ञानेश्वरींत (अ.११-४७८) हा शब्द आलेला आहे. महाराष्ट्र शब्दकोशांत 'आड+सं. कीलक' अशी व्युत्पत्ति दिली आहे ती चिन्त्य होय. कारण येथें कीलक—खिळा याचा कांहीं संबंध पोचत नाहीं. आडखिळा हा कानडी शब्द होय. आड-खेळ व खिळा—ढीग. बाल षडाननानें क्रौंचपर्वत हाच लगोऱ्यांचा ढीग कल्पून तो बाण मारून भेदल्याची कथा आहे.

( ३७ ) लोहदंतु पडला रणीं । देषा कांपीनली धरणी ।
दळीं बाणाचा हाहांकारु । तेव्हळी षळबळली अरणी ॥ १४१६ ॥

अरणी = रणमैदान अशी येथें टीप आहे ती समर्पक नाहीं. अरणी हा शब्द पुढें ओ. १६०६ व ओ. १६२० मध्यें आला आहे. ओवी १६२० मध्यें "टाकीलि मागीली अरणी" म्हणजे पुढून पळालेलें सैन्य "मागील अरणीवर येऊन ठेपलें" असें वर्णिलें आहे. त्यावरून ओवी १६०६ मध्यें सैन्याची जी अरणी मोडली व सैन्य मागें पळालें म्हणून सांगितलें आहे ती अरणी म्हणजे पुढली अरणी होय हें उघड आहे. अशा प्रकारें येथें सैन्याची पुढली अरणी आणि मागली अरणी अशा दोन अरणी उल्लेखिलेल्या आहेत. यावरून ह्या दोन अरणी म्हणजे आघाडी व पिछाडी होत असें दिसून येतें. म्हणून अरणी = सीमा, सीमारेषा. शेताच्या सीमेवरील ओटयास आजही ऐरणी म्हणतात.

( ३८ ) घाये बांधले ने तवटें । आपुला सारथी सावदु केला ॥ १४१७ ॥

तवटें= धैर्यानें असा अर्थ राजवाडे देतात व कोशकार तोच उतरून घेऊन त्यास आधार म्हणून हेंच येथलें अवतरण देतात. पण जखमा बांधून सारथ्यास सावध करण्यास मोठेसें धैर्य लागतें अशांतला भाग नाहीं; म्हणून **धैर्यानें** हा अर्थ प्रसंगोचित दिसत नाहीं. रणांगणांत घाय कशानें बांधावयाचे हा मात्र प्रश्न पडतो. त्याचें उत्तर **तवटें** ह्या शब्दानें मिळतें. तवट=तिवट=पागोटें. तिवट हा शब्द ऐतिहासिक पत्रांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. आणि रणांगणांत पागोट्यानें जखमा बांधल्याचीं वर्णनें आलीं आहेत. येथें **बांधलेयेने** हा एक शब्द हवा आहे. तवटें घाये बांधलेने= पागोट्यानें जखमा बांधल्यानें.

धैर्य हा अर्थ **तवक** ह्या शब्दाचा आहे, **तवट** ह्या शब्दाचा नाहीं. वर्णसादृश्यानें तो भासला असावा आणि **बांधलेने** यांत **बांधले** व **ने** असा चुकीचा पदच्छेद केल्यानें ही दिशाभूल झाली असावी.

( ३९ ) नीतंब वेढीले गाढे। जैसे पणासले हुडे।
दोन्ही आघातीचीं हुलमुखें। सरळे वाढताती पुढें॥ १४२७॥

पूर्वार्धांत नितंब व हुडे ( बुरूज ) म्हणजे उपमेय व उपमान दोन्ही उक्त आहेत. उत्तरार्धांत हुलमुखें हा एकच शब्द आहे. तो उपमेयदर्शक कीं उपमावाचक ! टीपेंत हुडमुख हुलमुख= बुरजाचीं तोंडें असें निर्वचन केलें आहे. तें धरल्यास हा उपमानवाचक शब्द होईल. उरोमुख-हुलमुख (=स्तन) असें धरल्यास हा उपमेयवाचक शब्द होईल. विहिरीच्या मोटवणाखालचे जे पुढें आलेले वाटोळे दगड त्यांस हुनमुख म्हणतात. हुनमुख=हुलमुख असेंही म्हणतां येईल. पण हें उपमान येथें प्रसंगोचित होत नाहीं.

टीपेंत दिलेली व्युत्पत्ति असंभाव्य नसली तरी तीस कांहीं अडचणी आहेत. हुडा हा शब्द कानडी आहे, संस्कृत नाहीं. शिवाय अकारान्त घ्यावा लागतो. तसा घेतला तरी हुड्यास म्हणजे बुरजांस मुखें नसतात. त्यांस दरवाजे असतात असें मानलें व तींच मुखें म्हटलीं तरी तीं ( सरळे वाढताती पुढें ) सरळ पुढें कशीं वाढतात हें कांहीं कळत नाहीं. त्यापेक्षां उरोमुख-हुलमुख=स्तन असा प्रस्तुत-वाचक अर्थ घेणें बरें, असें वाटतें.

आघाट-आघात= पायऱ्यांचे टप्पे अशी टीप दिलेली आहे. नदीच्या घाटावरून ही पायऱ्यांची कल्पना सुचली असावी. पण प्रस्तुत स्थळीं पायऱ्या हा अर्थ संभवत नाहीं. याच्या पुढल्याच ओवींत " आघातीचां चोरदरां " यांत हाच शब्द पुन्हां आला आहे; तेथेंही पायऱ्या हा अर्थ जमत नाहीं आणि संस्कृत कोशांत आघाट शब्दाचा तो अर्थ आढळत नाहीं. आघाट = हद्द, मर्यादा; यावरून ( अरणीप्रमाणेंच ) आघाती = आघाडी असा अर्थ संभवेल व तो ह्या दोन्ही ओंव्यांत नीट जमतो. नितंबांचें म्हणजे पिछाडीच्या हुड्यांचें वर्णन झाल्यावर पुढें आघाडीच्या हुलमुखांचें ( म्हणजे स्तनांचें ) वर्णन येणें हें क्रमप्राप्तच आहे.

( ४० ) दुर्गीं वदनाचां दारवटां। बैसोनि हांसताती सुभट।
लोचणाच्या चरियां वरी। बाण सुटत वंकट॥ १४२९॥

प्रमदांचे दंत हे मदनाचे सैनिकच, हास्य हें त्यांचें शस्त्र, असें पूर्वार्धांत वर्णिलें असून उत्तरार्धांत लोचन ह्या सैनिकांचें वर्णन " लोचनांच्या लीलांनीं वक्रबाण सुटतात " अशा प्रकारें केलें आहे. चर्या-चरिया = लीला, हालचाल, मुरडणें. चरियांवरी = लीलांनीं. टीपेंत चत्वरी-चरी = स्थान असा अर्थ दिला आहे. पण वक्रबाण सुटतात ते लोचनांच्या स्थानांवर किंवा स्थानांनीं नव्हे तर त्यांच्या हाल-चालीनें म्हणून येथें चरिया ( चर्या ) = लीला हाच अर्थ आहे.

( ४१ ) बाण सुटत वंकट । बाण उजू ची येत नीट ।
ऐसा विपरीतु ज्याचा मारु । घाया नाहीं **वनु पाटा** ॥ १४३० ॥

या ओवीच्या जोडीस पुढील ओवी-खंड पहा—

रणीं झुंजारू घायेंवटे । तरी **वणियां** न बंधिजाति **पाटे** ॥
भास्कररुत उद्धवगीता २४१

तींहीं **घाईं** पींडि **पाटें** । बांधिजताती आझुनी वरी ॥ उखा. १५४५॥

या स्थलांवरून वनु–वण = व्रण, जखम; पाटा–पट्ट = अरुंद लांब कपडा, म्हणजे जखम बांधण्याचा पट्टा ( बँडेज ) हे अर्थ स्पष्ट आहेत. प्रस्तुत ओळींत मदनाचा विपरीत मारा सुंदर वर्णिला आहे. बाण सुटतात वाकडे पण लागतात नेमके सरळ येऊन! जखमा होतात पण त्या अंतर्यामीं. बाहेर ओरखडाही दिसायाचा नाहीं. मग जखम बांधण्यास कपड्याची गरज काय? असें हें सुंदर वर्णन आहे. पण टीपेंत वनु = पाणी आणि पाटा = वाहाणें असे अर्थ दिले आहेत!

( ४२ ) तीपटा युवनाचीया अणिया। तिहीं पोंचत जीव्हार ॥ १४३२ ॥

युवन = जोबन ( हिंदी ) = स्तन; अणियी = अग्रें.

टीपेंत युवन = यौवन असा अर्थ दिला आहे!

( ४३ ) देपा मोडलेया अरणी । धीरु न बंधवे चि रणीं ।
मोडले दळभार । गेले गेले हाती साहाणी ॥ १६०६ ॥
मोडलें वीकळ साहाण । रणीं सांडवलें नीसाण ।

अरणी आणि रण हे दोन शब्द एकाच वाक्यांत आले आहेत. अर्थात् येथें त्यांचे अर्थामध्यें भेद आहे. मागें अरणी म्हणजे आघाडी, रणांगण नव्हे, असें दाखविलें आहे त्यास हें उदाहरणही पोषकच आहे.

साहाण = शहाजण = मोठा नगारा. साहाणी हाती = मोठ्या नगाऱ्यांचे हत्ती. नगारा ह्या अर्थाचा साहाण शब्द महाराष्ट्र शब्दकोशांत दिलेला नाहीं. राजवाड्यांनीं साहाण शब्दावर टीप दिली असती तर तो शब्द कोशांत घेतला गेला असता. कोशकारांनीं तळटीपाच तेवढ्या पाहिल्या, मूळ काव्य पाहून शब्दांचा संग्रह केला नाहीं याचा हा पुरावाच होय.

( ४४ ) ( आ ) णीक पाहाते जालें : मग चालीला बाणासुरु ॥ १६२४ ॥

यांतील पहिल्या चरणाचा अर्थ समर्पक लागत नाहीं. पण

**आणीक पाहा तेजाळें** असा पदच्छेद केल्यास अर्थ चांगला जमतो. बाणासुर आणीक तेजाळे पहा = बाणासुराचें तेज अधिकच वाढलें, पहा.

( ४५ ) आंगीं थोडें ची दळवाडें । पण रागीटु कवणी पाडें ॥ १६५९ ॥

दळवाडें = दळवेपण = शौर्य. हा अर्थ कोशांत दिलेला नाहीं. कारण राजवाड्यांनीं या शब्दावर टपि दिलेली नाहीं.

( ४६ ) आटू भवीनला सुरुवरां ॥ १६७७ ॥

भवीनला = झाला. अर्थात् भू–भव्–होणें यापासून येथील भवीनला शब्द झाला आहे. पण टीपेंत भ्रम् धातूपासून हा शब्द निघाल्याचें दर्शविलें आहे, तें अर्थास धरून नाहीं.

( ४७ ) मना तैसें चि घडलें । दोघां जुंझावें पडलें ॥ १६८४ ॥

येथें मन ह्या नामाचें संबोधन येण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. तेव्हां मनाक् ( क्षणभर ) असा येथील मूळ पाठ असावा. लेखकानें त्याचा अर्थ न कळल्यामुळें किंवा चुकून क् गाळून त्याचें **मना** केलें असावें.

( ४८ ) तेजें आकास षीरडत । सूर्या जाली सपुजता ॥ १६८८ ॥

येथें ब्रह्मास्त्राच्या तेजाचें वर्णन कर्तव्य आहे. त्या ब्रह्मास्त्राच्या तेजांत सूर्याचें तेज लोपलें, ( सूर्याचे तेजांत चंद्र लोपतो त्याप्रमाणें सूर्याच्या सहस्रपट दुसरें तेज प्रगट झालें तर त्यांत सूर्यही लोपेलच ) असें वर्णिलें तरच ब्रह्मास्त्राचें तेज सूर्याच्या तेजाहून अधिक ठरेल व त्याचें उत्तम वर्णन केल्यासारखें होईल. पण येथें टीपेंत सपुजता = दैदीप्यमानता असा अर्थ दिला आहे ! येथें सपूजता = शून्यता, निस्तेजता असाच अर्थ व्हावयास हवा आहे. पूज्य = शून्य यावरून येथील सपूजता शब्द कवीनें बनविला असावा. महाराष्ट्र–शब्दकोशांत सपूजता हा शब्द दिलेला नाहीं. तसेंच खिरडणें–पेटणें, जळूं लागणें हाही अर्थ कोशांत दिला नाहीं.

( ४९ ) चांचु फाळीती करवळें ॥ १७१६ ॥

सर्पास्त्रापासून उत्पन्न झालेल्या असंख्य सर्पांच्या नाशार्थ कृष्णानें गरुडास्त्र सोडून असंख्य गरुड उत्पन्न केले, त्या गरुडांच्या कृतीचें हें वर्णन आहे. चांचु = चोचीनें फाळिती = फाडिती, विदारिती. फाळिती ह्याचा कर्ता गरूड; कर्म करवळें; तें सर्पवाचक आहे हें उघड आहे. किरविल = सर्प. ( किरविल जैसा पसरला. वेणाकृत सीतास्वयंवर ) किरविल = करवळ; याचें अनेकवचन करवळें.

टीपेंत व–ब यांचा अभेद कल्पून **करबळें**=करांच्या सामर्थ्यानें असा अर्थ दिला आहे, पण गरुडास कर कोठले ? शिवाय येथें चांचु हें करण आहेच. दुसऱ्या करणाची अपेक्षा नसून **फाळिती** ह्यास कर्माची मात्र अपेक्षा आहे. म्हणून करवळें=सर्प हाच अर्थ होय.

(५०) ऐसें रूपाचें लावण्य। पण उघडी वस्त्रहणि।
हाती घेउनीयां आधाटीं। फांकला रंगध्वनी आकर्षलें त्रिभुवन॥१८१३॥

रंग आणि ध्वनी हे शब्द पृथक् हवेत. रंग फांकला=रणांगण पांगलें, लढाईची गर्दी थांबली. ध्वनी (तृतीया) --ध्वनीनें त्रिभुवन आकर्षिलें. वीर मोहित होऊन लढण्याचें विसरलें तें कशाच्या ध्वनीनें ? वाद्याच्या ध्वनीनें की मोहिनीच्या कंठांतून निघालेल्या ध्वनीनें ? मोहिनीनें हातीं आघाटी हें वाद्य घेतलें आहे. आघाटी=किनरी, एकतारी, एकतंतुवाद्य, असा अर्थ महाराष्ट्र शब्द कोशांत दिला आहे. ऋग्वेदांत आघाटि हा शब्द आला आहे (१०-१४६-२). त्याचा अर्थ चित्राव शास्त्री यांनी घंटा असा केला आहे. आघाट=झांज असा अर्थ गीर्वाणकोशांत आढळतो. तेव्हां सं. आघाटि किंवा म. आघाटी हें खरोखर कशाप्रकारचें वाद्य आहे, घंटा झांज यांप्रमाणें आघातानें वाजणारें वाद्य आहे, कीं एकतारीसारखें तंतुवाद्य आहे याचा निर्णय चिकित्सकांनी करावा. राजवाडे टीपेंत म्हणतात त्याप्रमाणें आधाठी–अधाटी–बधाटी=लवचीक फांदी किंवा दोरी, हा अर्थ मात्र येथें लागू पडत नाहीं हें निर्विवाद होय.

आघाटी असा खरा शब्द असतां पोथींत चुकून आधाटी असें पडलें आहे. घ आणि ध यांचे रूपांत साम्य असल्यामुळें नकल करतांना अशी चूक होणें साहजिक आहे. पण पोथींत एकदां चुकून आधाटी असें पडलें आहे एवढ्याच वरून त्या अशुद्ध रूपास कोशांत स्थान मिळावें हें योग्य वाटत नाहीं. पोथ्यांतील अशीं अशुद्ध रूपेंही कोशांत समाविष्ट करावयाचीं म्हटल्यास त्यास अंतपार राहणार नाहीं.

येथवर तळटीपांच्या स्वरूपाचें आविष्करण होण्यापुरतें मोजक्या स्थलांसंबंधीं थोडक्यांत विवेचन केलें आहे. टिपा दिलेल्या व न दिलेल्या आणखी पुष्कळच स्थलांसंबंधानें लिहिण्याजोगें आहे. पण हें काव्य संपूर्ण उपलब्ध होऊन तें पुन्हां छापण्याचा योग येईल तर त्या वेळीं साकल्यानें विचार करणें युक्त होईल. विस्तारभयास्तव येथें तो करितां येत नाहीं. आजवर अनेक संशोधकांनीं जुने काव्यग्रंथ टीपा देऊन प्रकाशित केले आहेत. तेवढ्यावर समाधान न मानतां त्यांची सूक्ष्म चिकित्सा करून त्यांच्या अधिकृत प्रती निर्माण करणें कसें अगत्याचें आहे, हें ह्या लेखानें विद्वज्जनांच्या निदर्शनास येईल अशी आशा आहे.

---

# कांहीं अप्रसिद्ध मराठी पद्यकार व त्यांचीं पदें

( डॉ. रा. ग. हर्षे, पुणें )

काव्यसंग्रहकार कै. वामन दाजी ओक व त्यांचे सहकारी यांनीं निर्णयसागर मुद्रणालयाच्या विद्यमानें "अनेककविकृत पदें, कटाव, लावण्या वगैरे" पद्यात्मक वाङ्मय तीन भागांत प्रसिद्ध केल्याला अर्धशतक होऊन गेलें. या मुदतींत संशोधन-कार्याची एवढी प्रगति झाली आहे कीं, फिरून एकदां तें पद्यवाङ्मय प्रकाशित करण्याचें कार्य अंगावर घेण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, प्रकाशित झालें असूनहि या पद्यवाङ्मयाचा अभ्यास जसा हृदयग्राहित्वानें व्हावयास पाहिजे तसा तो झालेला नाहीं. या तिन्ही भागांत मिळून सुमारें पाऊणशें कवींचीं १६४२ पदें प्रसिद्ध झालीं आहेत. तथापि हा प्रसिद्ध झालेला भाग उप-लब्ध व अप्रकाशित असलेल्या पदांच्या दृष्टीनें पाहतां अत्यल्प आहे असें म्हणण्यांत बिलकूल अतिशयोक्ति नाहीं. म्हणून केवळ वानगी दाखल मला उपलब्ध झालेल्या एका खाजगी हस्तलिखित बाडांतून वरील तिन्ही भागांत अंतर्भूत न झालेल्या सुमारें २४ कवींच्या माझ्या माहितीप्रमाणें प्रसिद्ध न झालेल्या अशा ६०–६२ पदांचा परिचय करून देण्याचा प्रस्तुत निबंधाचा उद्देश आहे. संतकविकाव्यसूचि, महाराष्ट्र-सारस्वताच्या ( आवृत्ति २ री ) शेवटीं जोडलेली सूचि व रामदासी संशोधनसूचि यांमध्येंहि ज्यांचा उल्लेख नाहीं असे तीन चार कवीहि यांत आलेले आहेत. परंतु केवळ उल्लेखाव्यतिरिक्त यांचीं पदें कोठेंहि निर्दिष्ट केलेलीं नसल्यामुळें हें सबंध वाङ्मय अप्रसिद्धच म्हटलें पाहिजे. केवळ नामसादृश्यामुळें यांतील ग्रंथकारांचा उल्लेख सूचींत झाला असला तरी अनिश्चित माहिती जास्त सुस्पष्ट करण्यास या पदांचा थोडा तरी उपयोग होईल असें वाटतें. तरुण अभ्यासकांचें इकडे लक्ष गेलें व उपलब्ध असलेल्या बाडांचा अभ्यास करून निरनिराळ्या कवींचे पदसंग्रह तयार करण्यांत आले तर या निबंध वाचनाचा हेतु सफल झाला असें होईल.

मराठींतील या पद्यवाङ्मयाचें महत्त्व अनेक दृष्टींनीं लक्षांत घेण्यासारखें आहे. एक तर महाराष्ट्र संगीताच्या पुरस्कर्त्यांस तें एक बहुमोल भांडार वाटेल. "महाराष्ट्र संगीत विरुद्ध हिंदुस्थानी संगीत" असा निष्कारण वितंडवाद घालणाऱ्या संगीत-ज्ञांनीं या पद्यवाङ्मयाचा अभ्यास केला व यांतील विविध चालींचें संशोधनपूर्वक पुनरुज्जीवन केलें तर महाराष्ट्र संगीताची अधिक पायाशुद्ध रचना करतां येईल. फार प्राचीन काळापासून महाराष्ट्रांत कीर्तन–संप्रदाय रूढ असल्यामुळें हें पद्य-वाङ्मय अतिशय समृद्ध आहे, इतकेंच नव्हे तर त्यांत चालींची विविधताहि भरपूर

आहे. हिंदुस्थानी संगीताचा रूढ अर्थानें जन्महि झाला नव्हता त्या वेळचेंहि पद्य-वाङ्मय उपलब्ध आहे. भाषेपुरतेंच बोलावयाचें तर आपल्या मराठी कवींनीं हिंदुस्थानी भाषेंत शेंकडों सुरस पद्यें केलेलीं असून त्यांचा पुनरुद्धार केल्यास जसें तें त्यांच्या कर्त्यांस तसेंच तें त्यांच्या गायकांसहि भूषणास्पद होईल. आश्चर्याची गोष्ट ही कीं, अगदीं ज्ञानेश्वरापासून ते थेट अमृतराय कवीपर्यंत बहुतेक प्रसिद्ध संतकवींनीं हिंदुस्थानी पद्यरचना व अभंगरचना करून महाराष्ट्रेतर हिंदुस्थानाशीं आपला अविभाज्य संबंध राखला व महाराष्ट्र-संस्कृतीची छाप इतर प्रांतांवर कायम ठेविली. नामदेवानें तर एक पद* पांच भाषांत लिहिलें आहे ही केवढी कौतुकास्पद गोष्ट आहे!

हें पद्यवाङ्मयच गोड चाली व सुश्लिष्ट पदरचना या दृष्टीनें जितकें मनोवेधक तितकेंच तें काव्यदृष्ट्याहि सरस आहे. गायकांनीं दिलेल्या गायकी चालींत गद्याचा गळाठा ओतून केलेल्या आधुनिक नाटकांतील पदांप्रमाणें तीं नाहींत. कीर्तन-प्रसंगीं सहजस्फूर्तीनें काव्यरचना करणारे अनेक संतकवि आपणांमध्यें होऊन गेले आहेत. यामुळें भक्तीचा ओलावा, जिव्हाळ्याचें प्रेम, सहजस्फूर्त उज्ज्वल प्रतिभा व सुमधुर संगीत यांचें उत्कृष्ट संमेलन आपणांस यांतील सरस पदांत आढळेल.

ईश्वरभक्ति व प्रभुगुणगान हाच या वाङ्मयाचा प्रधानगुण असल्यामुळें यांत विषयांची व काव्यप्रसंगांची पुनरुक्ति आढळेल. पण कोणत्याहि संग्रहग्रंथांत हा दोष अपरिहार्य आहे. श्रीकृष्णचरित्राविषयीं भागवतधर्मी महाराष्ट्राला निरतिशय प्रेम वाटत असल्यामुळें या वाङ्मयांतील बहुतेक भाग त्यानेंच व्यापिलेला आहे. मुरली व गोपिकांचें कृष्णविषयक प्रेम हा आतां थट्टेचा विषय झालेला आहे. त्याचें समर्थन करण्याचा प्रयत्न आजवर अनेकांनीं आपआपल्या परीनें केला आहे. उत्कटत्वामुळें स्वैरिणीचें प्रेम उपमानभूत समजलें पाहिजे म्हणून गोपिकांच्या कृष्ण-भक्तीचें वर्णन त्याच्या आश्रयानें करण्याचा प्रघात आहे असें कोणी म्हणतात, ईश्वरी प्रेमाचें हें प्रतीक मानवी प्रेमाच्या मापानें मोजणें अयोग्य होय असें कांहींचें म्हणणें आहे. उलट स्वतःच्या विषयवासनातृप्तीसाठीं भोळ्याभाबड्यांची फसवणूक करण्याचें हें दांभिक मोहजाल आहे असें मानणारेच बहुतेक आहेत. परंतु त्याचें खरें समर्थन एका पद्यकारानें स्वतःच म्हटल्याप्रमाणें थोडक्यांत असें देतां येईल कीं, नवविधा भक्तीप्रमाणेंच पारमार्थिक कविता म्हणजे नवरसयुक्त प्रभुगुणगान आहे[१]. नामदेव किंवा एकनाथ, तुकाराम, इत्यादि संतशिरोमणींच्या काव्याकडे पाहिलें

---

* अ. क. कृ. पद्यें इ०, भाग १ ला, पृ. १८ पद ३४ वें.

१ “नवविधा भक्ति हे कसी नकळत कांहीं।
तुझी नवरसगुण हे लिळा वर्णिली नाहीं.”—रामसुत.

असतां ही उपपत्ति खरी असल्याचा निर्वाळा कोणासहि देतां येईल. माझ्या मतें ही उपपत्ति अभिनव, स्वाभाविक व सुसंगत आहे. प्राचीन संतवाङ्मयाचें हें स्वरूप लक्षांत ठेवलें म्हणजे कृष्णलीलेसंबंधींचीं पदें वाचतांना त्यांत अयोग्य असें कांहीं वाटणार नाहीं.

हा पदसंग्रह असलेल्या बाडावर कालनिर्देश नाहीं. परंतु हें बाड केदारभट्ट शेंडचे या नांवाच्या गृहस्थांनीं लिहिलेलें आहे याबद्दल खात्री वाटते. कारण एतत्सदृश लिहिलेलीं अनेक प्रकरणें माझे आप्त श्रीयुत धोंडो गोविंद पराडकर, इनामदार, कातवडी ( ता. पाटण, जि. सातारा ) यांच्या दप्तराच्या तपासणींत मला आढळलीं. त्यावरून व इतरत्र असलेल्या कालनिर्देशावरून हीं पदें शक १७८३ पूर्वीं लिहिलीं गेलेलीं आहेत एवढें निश्चित होय. या बाडांत एकंदर दोन अडीचशें पदें असून त्यांतून प्रस्तुतची ही निवड करण्यांत आलेली आहे. अक्षर फार सुंदर व मोहोरेदार असून कागद सुडाचा पातळ पण न फुटका ७"×६" या आकाराचा आहे. प्रतिपृष्ठ १६–१७ ओळी साधारणपणें लिहिलेल्या आहेत. पत्र संख्या १०० असून फक्त ७७ वें पत्र गहाळ झालें आहे. अक्षराचें वळण जुनें देवनागरी असून त्यांत अनावश्यक अनुच्चारित अनुस्वार गाळले आहेत. पदांच्या चाली अपरिचित असल्यामुळें ऱ्हस्वदीर्घांचा अनुक्रम किती चुकीचा आहे तें सांगतां येत नाहीं. अ बाळबोधी, दीर्घ ऊ रफारयुक्त, स्थबद्दल स्छ, द्ध बद्दल ध्ध, लिहिलें असून सर्वत्र म्ह ह्म व ष्ण-ष्ठ असा जुन्या वळणाचा काढलेला आहे. अशी थोडक्यांत त्यांतील अक्षर–वटिका सांगतां येईल. लिखाण शेवटपर्यंत एकटाकी बिन खोडलेलें टापटिपीचें व सुंदर असून क्वचित् ठिकाणीं हरताळाचा उपयोग केलेला आहे.

कवींचा कालनिर्देश व चरित्रविषयक माहिती बहुंशीं उपलब्ध नसल्यामुळें त्यांचा परिचय सोईसाठीं अकार विल्हेनें करून देण्यांत येत आहे.

**१. चिंतामणि कवि**—पद : " पावन तूझे नीर गंगे हो पावन. "

पदकर्ते चिंतामणि अनेक आढळतात. रा. सं. सूचींत त्यांचा उल्लेख बाडांक १२०१, १२५४, १६३९ मध्यें असून महाराष्ट्र सारस्वतकारांनीं ध्रुवाख्यान व सीतास्वयंवर कर्ता ठरविलेला ज्योतिर्विद् राजजीवसूनु चिंतामणि हाच वरील पदाचा कर्ता असावा असें वाटतें. ' चिंतामणि रत्नाकर ' नांवाचा ज्योतिषविषयक ग्रंथ याचाच असून तो नरहरिभक्त दिसतो. वरील पद्यांत पंचवटी राम व गौतममुनी यांचा उल्लेख आहे; त्यावरून ही गंगा म्हणजे गोदावरीच होय. कवि पंचवटीस गेला असतांना हें पद रचलें गेलें असें ' चिंतामणि कवि ( तिच्या पापहारकतेची कीर्ति ) ऐकुनि आला; त्याला प्राप्त सुनीर ' या शेवटच्या ओळीवरून दिसतें.

**२. चिंतामणिसुत**—पदः " उद्धवा म्हणति गोपिका हरिशी आणा० "

रा. सं. सूचींत चिंतामणिसुत मुद्गलाचा बाडांक ६८८, ७७८ मध्यें उल्लेख आहे; परंतु म. सा. सूचींतील पदकर्ता चिंतामणि-सुत व हा एकच असें निश्चित सांगतां येत नाहीं. लावणीच्या चालीवरील हें पद अक्रूरानें कृष्णाला मथुरेला नेल्यानंतर जो हाहाःकार झाला त्या करुण-प्रसंगावर आहे.

३. **नारायण**—पद : "कैसी गत माझी होयिल रामा०"

नारायण नांवाच्या अनेक कवींचा उल्लेख रा. सं. सूचींत केलेला आहे. "अनेक कविकृत पदें०" भाग ३ मध्यें नारायणबोवाकृत ९ पदें दिलीं आहेत. त्यांत हें पद नाहीं. ( पदें ३७२ ते ३८० पहा ). नारायणबोवा सुसंस्कृत व अधिकारी गृहस्थ दिसतात. ते हरिभक्तिपरायण आहेत. वरील रामभक्त पद्यकर्ता नारायण हा कल्याणस्वामींचा प्रशिष्य जो गदाधर त्यांचा मुलगा असावा. यांचा मठ जोगाईच्या आंब्यास आहे. रचना साधारण आहे.

४. **बालकदास**—यांची "मुरलि ग नोव्हे वरी" व "अजिच्या दिवसीचा मोठा लाभ जाला आगे बाई." अशीं दोन पदें या संग्रहांत आहेत. पदकर्ता बालकदास म्हणून एक कवि असल्याचा निर्देश सं. क. का. सूचींत व रामदासी संशोधनांत ( बाडांक १४४९ ) सांपडतो; पण तेथें कोणतीच माहिती दिलेली नाहीं. दुसऱ्या पदांतील "बालकदासा रूपा केली ॥ मोति पायासी राहियेला." या अन्त्योल्लेखावरून हा मोतीरामाचा शिष्य असावा असें दिसतें. या मोतीरामाचा उल्लेख कोणत्याहि सूचींत नाहीं, परंतु माझ्या जवळच्या अभंगाच्या बाडांत त्याचा खालील अभंग आढळतो :

"पहिला भ्रतार नयेचि मनासि । परपूरूषासि रत जाले ॥
लौकीकाची लाज दीधली सोडून । विठ्ठल नीधान जोडीयेला ॥
त्रितापें तापलें सासुऱ्या आसता । नीवाले मी आतां अंगसंगें ॥
मूळी गुरुबोध जाहला मजलागी । मोतीराम मनी हारुषला ॥

—अभंग ९० पत्रांक १८

बालकदासाच्या पहिल्या पदांतील

"ऐकुनि मुरली वनास गेले दहिदुध नेले चोरी ॥ १ ॥
रात्रि दिवसा झोप येयिना वेड्याच केल्या पोरी ॥ २ ॥

या दोन ओळी उल्लेखनीय आहेत.

५. **महिपति**—पद : "रणछोडरायजी दे दर्शन०"

हा महिपति सुप्रसिद्ध भगवद्भक्त चरित्रकार महिपतिबाबा ताहाराबादकर नसून दुसरा कोणी नरहरिशिष्य महिपति आहे. याचा उल्लेख रा. सं. सूचींत बाडांक

१४७५ मध्यें आहे. या महिपतीचीं ४ पदें अ. क. रु. पदें भाग ३ यामध्यें आलीं आहेत त्यांत वरील पद्य नाहीं. काव्यसंग्रहकारांनीं तळटीपेंत (पृ. ६६) भक्ति-विजयाचा कर्ता म्हणून याचा उल्लेख केला असून त्यास शेवटच्या अध्यायांतील २०० व्या ओवीचा आधार दिला आहे. परंतु आम्ही पाहिलेल्या निर्णयसागरच्या सन १९१५ च्या प्रतींत भक्तिविजयकर्ता नरहरि-शिष्य असल्याची उपरिनिर्दिष्ट ओवी नाहीं. वरील संदर्भ चुकीचा दिसतो, वरील पद कदाचित् डाकुरक्षेत्रीं कवि गेला असतां रचिलें असण्याचा संभव 'अनाथ परदेशि वनांत फिरतो करुणा यउ-या कांहि जी' या ओळीवरून दिसतो. या पदाची चाल गुजराथी गाण्यासारखी असून देवाच्या नैवेद्यास असलेल्या 'माखणमिश्रित शिऱ्याचा" त्यानें उल्लेख केला आहे. "लोहार कन्येसंगें खेळतां विचार केला नाहिं जी नाहिं जी" हा उल्लेख कोणत्या कथेस अनुलक्षून आहे तें समजत नाहीं. पद सुरस आहे.

६. **मातंगीगरद**—पद : "रमावरा सुंदरा दे उदारा पावि थारा."

हा कवि नवीन दिसतो. या पदाची रचना सुश्लिष्ट अनुप्रासयुक्त आहे. उदा-हरणार्थ "जलदलोचना जलदाभासा जलनिधिशयना जगन्निवासा जलविरहित निजजन हा मासा०" हें दुसरें कडवें पहा. हें पद विठ्ठलास उद्देशून असून भागवत-संप्रदायांतील लोकप्रसिद्ध कथांशीं याचा परिचय दिसतो व रचनाहि प्रौढ आहे.

८. **मानपुरी**—पद : "हरि मागे पूढे दाटला०"

७. **माधव किंवा माधवात्मा**—याचीं १९ पदें प्रस्तुत संग्रहांत आहेत. तीं येणेंप्रमाणें : पैकीं २ माधवाचीं असून बाकीचीं १७ माधव-आत्मा याचीं आहेत.

**माधव**—(१) पंढरिनाथ पंढरिनाथ
(२) किंति तरी अरे यादवा

**माधवआत्मा**—(१) रामकृष्ण नरहरी हरी रे
(२) सदनि उगाच छंद धरिसी
(३) कशि मथुरेसि जावु पदरी—
(४) वदनि वदाल कृष्ण जरि तो
(५) हें शिर पदिं त्याचे वाहूं
(६) तुजसाठीं जिव झुरे
(७) विठोबा तुझा तुझारे मला छंद
(८) विठोबा उभा चला पाहूं
(९) विठायी माय पंढरीची
(१०) गोविंद गोविंद गोपाल
(११) विठोबा नारायण हारी

(१२) विठ्ठल विठ्ठल विठाबाई
(१३) हेंचि मागतों तुला
(१४) विठाई सांवळे डोळसे
(१५) मजवरि करुणा रघुराया
(१६) बहुतासि विठोबा
(१७) क्षीर सागरिंचा वसणारा

माधव अनेक होऊन गेले. त्यांत सं. क. का. सूचीकर्ते माधव राघवदास व माधव विठ्ठलदास या दोघांचा पद्यकार म्हणून निर्देश करतात. रा. सं. सूचींत आणखीहि माधव दिले आहेत. " अनेक कवि कृत पदें भाग ३ यांमध्यें माधवाचीं म्हणून जीं १६ पदें दिलीं आहेत त्यांतील उल्लेखांवरून माधव, अखंडमाधव, राधा-माधव, राघवदासमाधव व माधवआत्मा असे वेगवेगळे कवि असल्याचा संशय येतो. अनेक बाडें तपासल्याखेरीज निर्णय करतां येणें कठिण आहे. वरील छापील १६ पदांचा ग्रंथकर्त्यांच्या नांवाप्रमाणें निर्देश कसा करतां येईल.

**माधव**—(१) माधवा त्वां साधन केलें काय रे० (पद ४६७)
(२) प्रीति धरी हरिपायीं० (पद ४७०)
(३) यदुराज सखा रुसला० (४७४)
(हें पद माधवदासाचें दिसतें.)
(४) यदुपति गोवळरूप धरी तो (पद ४८५)
(५) आला हरि मनमंदिरीं (पद ४७८)
(६) मुद्रिके सखे त्वां कां त्यजिलें रामाशीं (पद ४८०)

**अखंडमाधव**—(१) माझ्या रामाला आणा कोणी जा गे (पद ४६८)
(२) क्यों करता मगरूरी काफर (पद ४८३)

**राधामाधव**—(१) चतुराकर नट हारी (पद ४६९)

**राघवदास माधव**—(१) वदनीं वदाल कृष्ण जरी तो (पद ४७७)
(२) प्रातः समय रघुवीर जपावे (पद ४८१)—(१)

**माधवआत्मा**—(१) लागला तोबा (पद ४६६)
(२) विठाबाई माय माझी (पद ४७१)
(३) विठोबा नारायण हारी (पद ४७२)
(४) रामकृष्ण नरहरी (पद ४७३)
(५) काशी मथुरेसी जाऊं पदरी (पद ४७६)

शेवटच्या पद्यांत–" चला जाऊं रघुनाथ–नगरीं " असा उल्लेख आहे. त्यावरून लाक्षणिक दृष्ट्या तो गुरूचा उल्लेख आहे असे मानिल्यास माधवआत्मा व राघवदास माधव हे एक ठरतात व ' वदनीं वदाल कृष्ण जरी तो ' हें पद आमच्या संग्रहांत माधवआत्म्याचें म्हणून दिलें असल्यानें उभयपक्षीं पुरावा मिळून ही एकरूपता सिद्ध होण्यासारखी आहे. परंतु या प्रश्नाची यापेक्षां जास्त छाननी केली पाहिजे.

आमच्या संग्रहींच्या माधवाचीं दोन्हीं पदें स्वतंत्र असून अप्रसिद्ध आहेत आणि हा माधव त्याच्याच म्हणण्यावरून एक विख्यात कीर्तनकार दिसतो ( देव देवी कीर्तन जगविख्यात ); माधवआत्मा देखील " कीर्तनी गाऊं, संतसमागमें राहूं " अशी इच्छा करतो. पंढरीच्या यात्रावर्णनावरून हा टाळकरी विठ्ठलभक्त दिसतो. " न चले कोणाची अर्जी, बहुतचि जाली बेमर्जी " या अमृतरायकृत दामाजी चरित्राच्या स्मारितावरून तो अमृतरायानंतरचा असावा असें वाटतें. यावरून माधव व माधवआत्मा हे एक नसावेत.

आमच्या संग्रहांतील १७ पदांपैकीं ५ पदें ( ४७१, ४७२, ४७३, ४७६, ४७७ ) अ. क. कृ. पदें भाग ३ मध्यें प्रसिद्ध झालीं असून बाकीचीं १२ आज नव्यानें लोकांपुढें येत आहेत. प्रसिद्ध झालेल्या पदांशीं तुलना केली असतां पुष्कळच फरक दृष्टीस पडतो व तो महत्त्वाचा आहे. ' वदनि वदाल कृष्ण जरी ' यांतील पहिल्या दुसऱ्या कडव्यांची अदलाबदल झाली असून पाठभेदहि दिसतो. परंतु मुद्याचा प्रश्न नामोल्लेखांची भिन्नता.

" माधव राघवनामस्मरणीं " बद्दल आमच्या पोथींत " माधव आत्मा त्रिजगाचा तुं " असा महत्त्वाचा बदल आहे व तो चिन्त्य आहे.

" विठायी माय पंढरीची " यांतहि पाठभेद पुष्कळ असून दुसऱ्या तिसऱ्या चरणांची अदलाबदल झाली आहे.

" विठोबा नारायण हरी " या पदांतहि महत्त्वाचे पाठभेद आहेत व निर्णयसागर प्रतीपेक्षां माझ्या पोथींतील पाठच सरस आहेत. ( उदाहरणार्थ, 'भव' बद्दल 'भवभय'; ' बोध सुरसाचे प्याले ' ही ओळ अधांतरीं लोंबकळते पण 'बोधसुरसाचे प्याले' म्हटल्यानें अर्थ पूर्ण होतो; ' शुक मुखीं किर्ति उच्चारी ' म्हणण्यापेक्षां ' तुझि मुखें कीर्ति उच्चारी ' म्हणण्यांत अधिक स्वारस्य आहे. )

" रामकृष्ण नरहरी हरी रे० " या पदाच्या बाबतींतहि तेंच म्हणतां येईल. ' पिसे चिलकडे तसा ' येथें लेखक प्रमाद असला पाहिजे हे माझ्या पाठांतील ' दिसे चौकडे तसा ' या पदांवरून उघड दिसतें. प्रत्येक कडव्याच्या शेवटच्या चरणांत जो फरक दिसतो तो पोथींतील सरस पाठानें अधिक अन्वर्थक

वाटतो. किंबहुना हें संबंध पद पुनः दुरुस्त करून छापलें पाहिजे असें वाटल्या-शिवाय रहात नाहीं.

अप्रसिद्ध अशीं जीं १२ पदें आहेत त्यांतील " विठायी सांवळे डोळसे रंगा येची हो " ह्या पदाचें धृपद नामदेवाच्या पदावरून घेतलेलें दिसतें. ( अ. क. रु. पदें भाग १ पृ. १७ पद ३१ ) किंबहुना ' क्षीरसागरिचा वसणारा । येरे गरुडावर बसणारा, ' " विठोबा तुझा तुझा रे मला छंद कपाळीं केशरी गंध;" "विठ्ठल विठ्ठल विठाबाई । छंद लागला तुझे पाईं ' हीं धृपदें भजन म्हणून सर्वांच्या परिचयाचीं आहेत. " तुजसाठीं जिव झुरे विठोबा " या पदांत भावना आहे. " आशा दुस्तर कशिही घात करी भ्रमवी मज परवरीं ॥ पावे अपमानातें लाज धरी दुःख बहु हे किती तरी " या ओळींत कदाचित् आत्मलेखनहि सांपडेल. " विठ्ठल विठ्ठल विठाबाई " मध्यें प्रसाद आहे. " हेचि मागतो तुला " हेंहि पद सरस आहे. सारांश, धंदेवाईक हरिदासाला शोभेल अशीच याची रचना असून याच्या विषयींची अधिक माहिती वारकरी लोकांकडून मिळण्याची शक्यता वाटते.

मानपुरीच्या पदांचे उल्लेख अनेक बाडांत असले ( रा. सं. सूची पहा ) तरी प्रत्यक्षतः त्याचें म्हणून एकच पद अ. क. रु. पदें भाग ३ रा पृष्ठ ९६ वर दिलें आहे, परंतु ' मानपुरी गुरुनाथ प्रसादें । भेटसि आपण आपा ॥ ३ ॥ ' या उल्लेखा-वरून हें पद मानपुरीचें नसून त्याच्या एखाद्या शिष्याचें असावें असें वाटतें. या मानपुरीचा मठ व समाधि दौलताबादेस आहे असें सं. क. का. सूचींत म्हटलें आहे.

९. **मुक्तेश्वर**—पद : " पवित्र सीतळ जळ माथा मंदाकिनी. "

पदकर्ता मुक्तेश्वराचा उल्लेख सं. क. का. सूचींत नाहीं. पण रामदासी संशोधन सूचीवरून सुमारें १२ बाडांत त्याचीं पदें सांपडत असल्याचें दिसतें. परंतु त्याचें एखादें पद प्रसिद्ध झाल्याचें अवलोकनांत नाहीं. हें संपूर्ण पद त्यांतील चमत्कृतीसाठीं येथें उद्धृत करण्यासारखें आहे.

पवित्र सीतळ जळ माथा मंदाकिनी ।
नेत्रीं धरियेला वन्हीं नवल काय ॥ धृ० ॥
गरुडारूढ मधुसूदन ॥ हृदयीं वसिजे पूर्ण ।
कंठीं सर्प आभरण नवल काय ॥ १ ॥
सिंव्हावरी वलंगता ॥ अंकी गिरिजा बैसे स्व ( स्त ) ता ॥
मारियेला कुंजर दैत्य नवल काय ॥ २ ॥
अहो लीलाविश्वं (ब) भरा ॥ शंभू हर शिवशंकरा ॥
तारियलें मुक्तेश्वरा नवल काय ॥ ३ ॥

१०. **यदुवीर**—पद : " यावा प्रसाद जी झडकरी ॥

यदुवीर कवीचा उल्लेख कोणत्याहि सूचींत नाहीं. रंगनाथ स्वामींचे यादव म्हणून एक बंधु होते. तेच हे असल्यास न कळे. शक १६०६ मध्यें ते समाधिस्थ झाले. " मेघःश्यामाचीं पाउलें यदुविर वंदितसे सीरीं " या उल्लेखावरून घनःश्याम हा त्यांचा गुरु असावा. त्याचीहि माहिती उपलब्ध नाहीं. श्रीहरीच्या प्रसादासाठीं कोण कोण आले त्यांचा उल्लेख वरील पदांत केला आहे.

**११. योगेश्वर**—पद : " रावण गर्वे बोलें "

या पदांतील रावणाची गर्वोक्ति सरस आहे हा योगेश्वर रंगनाथस्वामी निगडी-कर यांचा पुतण्या असल्यास त्याला शके १६१२ मध्यें जमीन दान मिळाल्याची सनद असल्याचा उल्लेख आहे. या खेरीज एक वासुदेवभटात्मज योगेश्वर आढळतो. दुसरा एक पदकर्ता योगानंद आहे; पण तो हा असेलसें वाटत नाहीं. हा योगेश्वर रामभक्त दिसतो.

**१३. रघुनाथ पंडित**—पद–" कैसी मज होय सखी दमयंती. "

रघुनाथपंडितांचें हें पद श्री. प्रियोळकरांनीं आपल्या " नलदमयंतीस्वयंवरा- " च्या आवृत्तींत दिलें आहे. माझ्या पोथींतील सरस पाठ लोकनिदर्शनास यावेत म्हणूनच त्यांची येथें चर्चा करीत आहे.

( १ ) प्रियोळकर प्रतींत असलेल्या " कै. सीतरुचींस नखीं नमयंती "–या पाठा ऐवजीं आमच्या पोथींत " कैसी तरुची न सखी दमयंती " असा पाठ आहे. सर्वसामान्य सौन्दर्यवर्णन प्रस्तुत असतां विशिष्ट अवयवाच्या वर्णनात्मक पाठास गौणत्व येणें स्वाभाविक आहे. सीतरुचि नखांपेक्षां तरुलतेच्या गात्रयष्टीची अभिप्रेत कल्पना अधिक इष्ट होय. पुढेंहि गतीचें वर्णन आहे तेंहि येथें वरील पाठभेद स्वीकारल्यास सुसंगत वाटेल.

( २ ) ' गुणगण ' नंतर ' गुणु गुणु गणयंती ' असा आमचा पाठ चालीच्या व अर्थाच्या दृष्टीनें स्वीकार्य आहे.

( ३ ) ' पुरुषायित जीचें घनकुच केलीं ' असा आमच्या पोथींतला पाठ असून ' सुरवर निकरहि ' च्या ऐवजीं ' सुरवरहि ' एवढींच पदें तेथें आहेत.

' लसंती ' याचा ' मार्गी टाकणारी ' असा अर्थ प्रियोळकर देतात तो कशाच्या आधारावर तें कळत नाहीं. ' लस् ' याचा अर्थ शोभायमान दिसणें, चमकणें असा आहे. सुखकर हरिहरांबरोबर देवांच्या समूहाचा निर्देश करण्यांत स्वारस्य नाहीं. वरद या विशेषणाचें मग तेथें काय प्रयोजन ? मलाच काय पण सुखकर हरिहरांना व वरद सुरश्रेष्ठांनाहि शोभायमान दिसणारी असा या पदांचा भावार्थ दिसतो.

( ४ ) प्रियोळकर प्रतींतील तिसरें व चौथें कडवें यांची अदलाबदल झालेली दिसतें. स्तनवर्णनाचाच तो भाग असल्यामुळें दूरान्वित राहतां कामा नये. तेथेंहि ' भृंगावलि नीला सांद्र शिरोजीं " यापेक्षां " भृंगापरि नीला सांद्र सरोजीं " हा आमचा पाठच सयुक्तिक आहे. 'कुटिलालक' वर्णिल्यानंतर फिरून 'नील शिरोजाचें' वर्णन पुनः करणें म्हणजे प्रक्रमभंग व पुनरुक्ति या दोषांस पात्र होणें होय. हें पंडित रघुनाथांच्या हातून सहसा घडणार नाहीं. ' सान्द्र ( सुखदस्पर्श ) अशा सरोजावर जसें नीलभृंग असावेत तसे भासणाऱ्या तुंगाग्र उरोजांच्या ठिकाणीं' हाच सरस अर्थ येथें विवक्षित आहे.

( ५ ) ' उटि लावुनि धरितां म्यां हनुवटिला ' हा तर अगदींच अप्रशस्त पाठ होय. त्यापेक्षां ' हात लावुनि म्यां धरितां हनुवटिला ' हें वस्तुस्थितीस अधिक धरून होईल.

( ६ ) ' धरिल निजहि मुख ' इत्यादि समग्र चरण समाधानकारक वाटत नाहीं. 'वरि ' हें विशेषण तर अगदींच विशोभित आहे. आमच्या पोथींत ' धरिल निजमुख ( हि ) चें येथें कसलेंच प्रयोजन दिसत नाहीं. ) करिल विमुख जरि हरिल हृदयि वरिल अविरलदंती" असा अन्वर्थक पाठ आहे. दमयंतीनें आपणांस वरावें अशी इच्छा व्यक्त केल्या ठिकाणींच पद संपावें हेंहि सुसंगतच असल्यानें छापील तिसरें कडवें चवथ्याच्या जागीं येणें इष्ट होय. अर्थात् कविनिर्देशाच्या शेवटच्या कडव्यांतहि कवीनें योजकतापूर्वक अर्थस्वारस्य वाढविलें आहे तें निराळें.

**१३. राघव**—राघव या नांवाखालीं दोन पदें आढळतात. परंतु तीं वेगवेगळ्या कर्त्यांचीं दिसतात. अनेककविकृत पदें भाग ३ मध्यें " का राम म्हणाना हो " हें पद राघवाचें म्हणून दिलें असून पदटीपेंत त्यांचें खरें नांव पांडोबा कुरकरे असल्याचें व ते ४०-५० वर्षांपूर्वीं ( सन १८५०-६० च्या दरम्यान ) सागर येथें रहात असल्याचें म्हटलें आहे ( पृ. ८१ पहा ). परंतु आमच्या संग्रहांत हें पद " सच्चित्सुख " कवीच्या नावावर दिलें आहे व तेंच बरोबर आहे. शेवटच्या चरणांत " सच्चितसुखद रुपा संपादुनि ॥ पूर्णपणें विचराना रे०॥ " असें आमच्या पोथींत असून छापील पाठ " सच्चित्सुखकर राघवमूर्ति ॥ पाहूं तुज नयना " असा आहे. " सच्चित्सुख ' हें विशेषनाम असल्याचें संपादकांच्या लक्षांत आलेलें नाहीं. याशिवाय राघव कवींचीं दोन पदें ( क्रमांक २१०, २११ ) व एक आरती ( क्रमांक २१२ ) छापलेली आहे. परंतु आमच्या पदांशीं त्यांचा संबंध नाहीं. यांतील पहिलें पद " तेव्हां सुख जाले हो सुख जाले ॥ अद्वय हातां आलें " हें अतिशय प्रसादयुक्त व गोड आहे.

'वेडा तामशी जोगी देखिला ग माय.' या पदाची भाषा गांवढळ असून अन्त्य-चरणांत राघवानें सिद्धनागेशाचा उल्लेख केला आहे. त्यावरूनच वडवाळसिद्ध किंवा अज्ञानसिद्ध नागेशाचा तो शिष्य असावा असें दिसतें.

**१४. रामसुत**—या कवीचीं एकंदर १२ पदें या संग्रहांत सांपडलीं. अ. क. रु. पदें भाग ३ पृ. १६० वर रामतनय कवीचें 'श्रीगुरुचे चरणकंज हृदयीं स्मरावें' हें पद दिलें आहे. पण तें पद वरील पदांत नाहीं. हेंच पद अ. क. रु. पदें भाग १ मध्यें रामदासांचें म्हणून दिलें आहे. (पद २७५ पृ. १२२ पहा). या रामसुत कवींसंबंधीं कोणतीच माहिती उपलब्ध नाहीं. यांच्या १२ पदांपैकीं ११ हरिभक्तिवर्णन व तदनुषंगिक उपदेश यासंबंधीं असून एक पद श्रीदत्तात्रेय नृसिंह-सरस्वती यांच्या विषयीं आहे. हीं सर्व पदें कीर्तनोपयोगी व हरिदासी थाटाचीं दिसतात.

**१५. रामसुतानुज**—याचें 'अहो नंदनंदा.' हें पद वरील पदापेक्षां सुरस असून त्याची चाल आधुनिक गज्जलासारखी वाटते. अनुप्रासहि चांगला साधला आहे.

**१६. रुक्माशरण**—हा कवि प्रथमच लोकनिदर्शनास येत आहे. याचीं दोन पदें या संग्रहांत सांपडलीं. यांची रचना संस्कृतप्राय इतकेंच नव्हे तर संस्कृतच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पैकीं पहिलें पद 'पिंनाकपाणे सांबा सांबा हो' हें शंकरविषयक व दुसरें "नारायण नारायण जय गोविंद हरे" हें कृष्णपर आहे. रुक्मण्णापंत म्हणून एका कवीचीं पदें असल्याचा उल्लेख रा. सं. सूचींत आहे. (बाडांक ५६९ व १४४९) हेच 'रुक्माशरण' असल्यास नकळे!

**१७. विनायक**—या विनायकाचा उल्लेख महाराष्ट्र-सारस्वतकारांनीं केला असून ते मोरोपंती अनुकरण करणारांपैकीं एक कवि आहेत असें म्हटलें आहे. सं. क. का. सूचीहि एका गणेशलीलामृत-कर्त्या विनायकाचा उल्लेख करिते. याच्या दोन पदांपैकीं पहिलें "विनायकाची अक्षरमाळा जप सर्वहि काळ" गणपतीस उद्देशून व दुसरें "शंकरा शेषशशिधरा" हें शंकरास उद्देशून आहे. दोन्ही पदांचीं रचना सुश्लिष्ट व यमकानुप्रासप्रचुर आहे.

**१८. शंकरसुत**—कवीचीं दोन पदें असून एक ज्ञानदेव स्तुतिपर व दुसरें करवीरनिवासिनी महालक्ष्मी संबंधीं आहे व तें अधिक चांगलें आहे. हा शंकरसुत सुप्रसिद्ध आरणीकर आनंदतनयाचा नातू असावा. पदकर्ता शंकरसुत एवढाच उल्लेख सं. क. का. सूचींत आहे. महाराष्ट्र-सारस्वतांत आनंदसुताच्या मुलाचें नांव शंकर असें दिलें आहे. (पा. ३०३ पद टीप पहा) तेंहि प्रस्तुत प्रकरणीं लागू पडणारें आहे.

१९. **सखारामदास**--म्हणून दुसरा एक कवि आहे, त्याचें " आहारे देवा काय हे करवीसी " हें पद एकनाथाचें म्हणून अ. क. रु. पदें भाग १ मध्यें दिलें आहे. (पृ. ३७ पद ७० ) पदांची व अक्षरांची फिरवाफिरव यांत केलेली दिसते. सखारामदासाची आणखी कांहीं पदें सांपडल्याखेरीज या पदाच्या कर्तृत्वा-संबंधीं अधिक कांहीं लिहितां येणार नाहीं. कारण असा कवि असल्याचा उल्लेख वरील कोणत्याही सूचिग्रंथांत आलेला नाहीं. पद अगदींच सामान्य आहे. 'कयाधू-विलाप ' हा त्याचा विषय होय.

२०. **सखारामसुत**—" ये धावत माझे आई कृष्णाबाई. " हा द्रौपदीचा वस्त्रहरणप्रसंगींचा धावा अनेक स्त्रियांच्या तोंडीं आहे.

२१. **सच्चित्सुख**--यांच्या चार पदांपैकीं " का राम म्हणाना हो." या संबंधीं मागें विवेचन झालेलेंच आहे. बाकीच्या तीन पदांत " उगली कां रुससी ललने न कळे. " हें पद शृंगारिक असलें तरी या संग्रहांतील सर्वोत्कृष्ट पदांपैकीं एक आहे असें म्हटलें पाहिजे. यांत उत्तान शृंगाराबरोबर गूढ अध्यात्मवादाचा पुरस्कार केला आहे. हा एक चांगल्यापैकीं कवि दिसतो. बाडांक १४४९ मध्यें याचीं पदें असल्याचें रा. सं सूचीकार म्हणतात.

२२. **सच्चिदानंद**—हा कवीहि नवीनच आहे. एक पदकर्ता सच्चिदानंद सं. क. का. सूचींत दिलेला आहे. पण तद्व्यतिरिक्त त्याची माहिती उपलब्ध नाहीं. त्याचें " त्रागडधिलांग धिमिति धिमि धिमिति " हें पद अभिनव असून श्रीकृ-ष्णाच्या विस्वरवादनांतील चूक गोपिकांनीं काढल्याचा सुरस प्रसंग त्यांत वर्णिला आहे.

२३. **सदानंद**—यांचे " ये रे ये रे राघोबा " हें पद त्याच्या धृपदाइतकें वाईट नाहीं. हे सदानंद कोण याचा निर्णय करणें कठिण आहे. पदकर्ते म्हणून एक म्हसवडकर सदानंद होऊन गेले ते हे नसावेत. कदाचित् पुरुषोत्तम-शिष्य किंवा धरणगांवकर सदानंद हे असल्यास न कळे. बाडांक ७५७, ७९३, ९९७ व १२१३ यांतील उल्लेख पाहिल्यास अधिक प्रकाश पडेल.

२४. **सिद्ध स्वानंद कल्याण**—हा एक नवीनच कवि असल्याचा निर्वाळा बाडांक ७५७ मध्यें रा. सं. सूचिकारांनीं दिला आहे. यांचें ' नमियेली रामदास माउली ' हें पद वाचून कवि सज्जनगडी प्रत्यक्ष गेले असावेत असें दिसत नाहीं. एरवीं " सज्जनगिरीं कृष्णावेण्यातटीं " असल्याचें चुकीचें विधान त्यांनीं केलें नसतें! सिद्ध स्वानंदकल्याणांनीं हें ' आभंगी नमन ' ' राज्यारामास ' तो दक्षिणेकडे कोठें तरी असतांना त्यास अर्पण केलें असावें असें दिसतें.

२५ हंसपरात्पर भारथिनायक—यांचीं कांहीं दत्तविषयक पदें मी अन्यत्र छापील स्थितींत पाहिलीं आहेत म्हणून त्यांच्या " श्रीपाद श्रीवल्लभ तारि तारि मजला " या पदाचा निर्देश मी करीत नाहीं.

सारांश, केवळ क्षुद्बोधार्थ ही वानगी मी आपणांस दिली आहे. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांनीं या पद्वाङ्मयाकडे आस्थेवाईकपणानें पाहिलें पाहिजे. भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें, राजवाडे संशोधक मंडळ व समर्थ वाग्देवता-मंदिर, धुळें, श्रीमंत राजेसाहेब औंध यांचें ग्रंथालय, सरस्वतीमहाल लायब्ररी, तंजावर, इत्यादि सार्वजनिक उपयोगाच्या संस्थांत मिळून आज कमींत कमी चार पांचशें बाडें सहज उपलब्ध होतीलही. तपासण्याच्या उद्योगास आपण लागलों तर केवढा अफाट पद्यसागर आपणांस सांपडेल याची कल्पनाच केलेली बरी. मराठी वाङ्मयाच्या तरुण अभ्यासकांची सेनाच हा सागर तरून जाण्यास समर्थ होईल. म्हणून तशी प्रेरणा त्यांस होवो. अशी इच्छा प्रदर्शित करून लेखन संपवितों.

---

# ' रामाचा ( बाण ) ' ही षष्ठी आहे काय ?

( श्री. गो. कृ. मोडक पुणें )

## १ चर्चेचें धोरण

' रामाचा ' हें रूप कसलें आहे? याचे स्थानीं संस्कृतांत ' रामस्य ' असें रूप येतें. ' रामस्य ' ही षष्ठी आहे; तेव्हां ' रामाचा ' हीहि षष्ठीच असावी असें प्रथमदर्शनीं वाटतें. हें वाटणें बरोबर आहे काय ? याचा विचार येथें करावयाचा आहे.

## २ विभक्तीचें कार्य—

' रामानें रावणास बाणानें वधिलें ' या वाक्यांत 'ठार मारणें' ही क्रिया 'वध' या धातूनें सांगितली आहे. ही क्रिया घडण्यांत कोणाकोणाचा संबंध आहे? याचें उत्तर ' रामानें ' ' रावणास ' 'बाणानें' हे शब्द देतात. यांतील 'राम' हा वधाक्रियेचा कर्ता आहे, ' रावण ' हें कर्म आणि ' बाण ' हें साधन म्हणजे करण आहे. यांपैकीं कर्ता ' नें ' या प्रत्ययानें किंवा तृतीया विभक्तीनें सुचविला आहे. कर्म द्वितीयेनें सांगितलें आहे व करण तृतीयेनें. यावरून हें उघड होतें कीं, **विभक्तीचें कार्य** म्हणजे क्रिया घडविण्यांत ज्या ज्या वस्तूंचा संबंध येतो त्या त्या वस्तूंचा विशिष्ट संबंध भिन्नभिन्न प्रत्ययांनीं दर्शविणें. हेंच लौकिक भाषेंत असें म्हणतां येईल ". विभक्ति-

प्रत्यय म्हणजे क्रिया घडतांना होणाऱ्या भिन्नभिन्न कार्याचीं दर्शक अशीं पदकें. " 'रामानें' यांतील 'नें' हें पदक असें सांगतें कीं, 'राम' हा कर्ता आहे. 'रावणास' यांतील 'स' प्रत्ययावरून स्पष्ट होतें कीं, 'रावण' हें कर्म आहे. 'भाषायाः अभ्यासः (भाषेचा अभ्यास)' यांत षष्ठीनें भाषा ही अभ्यासाचें कर्म किंवा विषय आहे असा बोध होतो. 'कावळ्याचा रंग' यांत षष्ठीवरून रंग धारण करणारा धर्मिन् म्ह. वस्तु कळून येते. या विवेचनावरून विभक्तीविषयीं पुढील कल्पना स्पष्ट होतात. विभक्तिप्रत्यय ज्या शब्दास लागतो त्या शब्दानें बोधित वस्तु (१) वाक्यगत क्रियेशीं कर्ता कर्म इत्यादि नातीं धारण करिते किंवा (२) पुढील नामानें दर्शित वस्तूशीं भिन्नभिन्न नात्यांनीं अन्वित असते.

## ३. 'रामाचा' यानें बोधित वस्तु

'रामाचा बाण' यांत रामाचा कोण ? याचें उत्तर 'बाण' असें मिळतें. येथें 'राम' हें प्रातिपदिक एका वीराचा बोध करितें, तर 'रामाचा' या रूपावरून 'बाण' हा पदार्थ व त्याची संख्या एक, इतकेंच सूचित होतें. अशा रीतीनें संपूर्ण रूप व तदन्तर्गत शब्द यांनीं वेगवेगळ्या दोन वस्तू बोधित होतात. हा प्रकार विभक्तीच्या कार्यांत आपणांस दिसत नाहीं. विभक्तीनें केवळ विशिष्ट वस्तूचें कार्य किंवा नातें दर्शविलें जातें. येथें 'रामाचा' या रूपानें विशिष्ट वस्तूची प्रतिसंबंधी वस्तु व ह्या वस्तूशीं नातें हीं दोनही सूचित होतात. यावरून 'रामाचा' ही विभक्ति नाहीं, हें सिद्ध होतें. प्रातिपदिकाहून भिन्न वस्तूचा बोध करणें हें विभक्तीचें कार्यच नाहीं.

'तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें । जूझाचेनि ।' (ज्ञा. १-८६) या वाक्यांत (१) व्याजें ही तृतीया आहे. ती सांगते कीं, व्याज (= निमित्त) हें गमनक्रियेचें कारण आहे, (२) 'माझे' या रूपाचा प्रकार निराळा आहे. या रूपांतील अंतर्गत मी-नें धृतराष्ट्र व 'माझे' या संपूर्ण रूपानें दुर्योधनादि त्याचे पुत्र अशा भिन्न भिन्न वस्तू सूचित होतात. अर्थात् वस्तूचें नातें याहून अधिक बोध येथें होत असल्यानें 'माझे' हें रूप विभक्ति ठरत नाहीं. माझे-चें संस्कृत प्रतिरूप 'मम' याचा प्रकार निराळा आहे. 'मम पुत्राः' यावरून ममधील अंतर्भूत व्यक्ति 'पुत्राः' चा संबंधी अथवा जनक आहे, एवढेंच बोधित होतें. म्हणजे मराठींतील मानीव षष्ठी ही एका वस्तूचें नातें आणि दुसरी वस्तु यांचा बोध करिते; तर संस्कृतांतील षष्ठी केवळ एका वस्तूचें नातें दर्शविते. सारांश, **मराठींतील** षष्ठी **नातें + वस्तु** यांची बोधक व **संस्कृतांतील** षष्ठी (केवळ) **नातें** याची बोधक; अर्थात् संस्कृत षष्ठी ही विभक्ति ठरते; मराठी षष्ठी ही विभक्ति ठरत नाहीं.

## ४. विभक्ति व साधित–

'लाकडी पाट' व 'लाकडाचा पाट' या दोहोंचा अर्थ एकच आहे. म्हणजे 'लाकडाचा' शब्द लाकडी–शीं सर्वथा तुल्यार्थक आहे. लाकूड + (साधित प्रत्यय) ई = लाकडी. यांतील 'लाकूड' यानें लाकूड या द्रव्याचा बोध होतो तर 'लाकडी' यानें तद्घटित एखाद्या वस्तूचा बोध होतो. 'लाकडी' यास आपण विभक्त्यन्त मानीत नाहीं, तर साधित रूप मानितों. 'लाकडाचा' यापासूनहि नेमका हाच बोध होतो, अर्थात् यावरून 'लाकडाचा' हा साधित शब्द मानणें प्राप्त आहे. या रूपांत साधित प्रत्यय कोणता ?

'लाकडाचा' या रूपाच्या अंतीं 'चा' हा प्रत्यय उघड दिसतो; मात्र हा प्रत्यय इतर साधित प्रत्ययांप्रमाणें मूळ रूप 'लाकूड' यास न लागतां 'लाकडा' अशा त्याच्या विकारास लागला आहे. दांडगाई, गोडपण, लांबी, माणुसकी, लघुत्व इ. साधित शब्दांत प्रत्यय लागले आहेत ते दांडगा, गोड, लांब, माणूस, लघु या मूळ शब्दरूपांस. भलेपण इ. ठिकाणीं शब्दाच्या विकृत रूपासही प्रत्यय लागतात. पण अशीं ठिकाणें थोडी असल्यानें येथें विचार्य नाहींत. तात्पर्य, रामाचा हें विभक्त्यन्त रूप नसून साधित रूप आहे.

## ५. 'रामा' या षष्ठीची सिद्धि–

संस्कृत षष्ठी रामस्य > रामस्स > रामास > रामाह > रामा या परंपरेनें 'रामा' हें रूप बनलें आहे. अर्थात 'रामा' हें षष्ठीचें रूप ठरतें व तसाच त्याचा प्रयोग ज्ञानेश्वरींत अनेक ठिकाणीं आढळतो. 'भीष्मा तळीं (ज्ञा. १–१२३)' 'कृष्णा मनीं (१–७७)' 'परमार्था जन्मभूमि (१–४८)' 'सापा मनौनी (१३– )' या उदाहरणांतील षष्ठींचे अर्थ वर्तमान मराठींत पुढील रूपांनीं व्यक्त होतील:— 'भीष्माच्या', 'कृष्णाच्या', 'परमार्थाची', 'सापाच्या'. वर्तमान मराठींतही कांहीं मोजक्या शब्दप्रयोगांत अशी षष्ठी आढळते. जसें **चाकरा** हातीं, **लोभा** पायीं, **कर्जा** पोटीं. संतकालीन पर्यांतही असलीं षष्ठीचीं रूपें उपलब्ध होतात. घाली हें शबयाख्यानांतील '.भिल्ली चोलुनि बोल सुंदर असे **रामा करीं** तीं फळें। उदाहरण प्रसिद्धच आहे. यावरून 'रामा' हें रूप व्युत्पत्ति व उपयोग या दोनही दृष्टींनीं षष्ठ्यन्त सिद्ध होतें.

## ६. रामा विरुद्ध रामाचा

रामा करीं = रामाच्या करीं. यावरून हें उघड आहे कीं, 'रामा' आणि 'रामाच्या' या दोनही पदांचा अर्थ एकच. या दोहोंत 'रामा' हें लहान आहे; पण त्यास खो देऊन 'रामाच्या' हें मोठें रूप रूढ झालें आहे. तेव्हां अशी शंका

येते कीं, अर्थात कांहींच भेद कर्तव्य नसतां, ' रामा ' या रूपाला भाषेनें ' चा ' प्रत्यय कां लाविला व ' रामाचा ' या मोठ्या रूपाचा स्वीकार करून ' रामा ' यास कां टाकिलें ? येथें विचार करितां लहान रूपाविषयींच भाषेचा पक्षपात प्रायः दिसून येतो. अहमदनगर, किरातार्जुनीय, फोटोग्राफ, ईयत्ता, आगबोट इत्यादि शब्दरूपांना त्यांच्याच लघुतर अथवा संक्षिप्त रूपांनीं पदभ्रष्ट केलेलें आपण पाहतों. वरील शब्दांच्या स्थानीं क्रमानें बहुधा पुढील रूपें येतात. नगर, किरात, फोटो, यत्ता, बोट. ' भगवद्गीतोपनिषत् ' याचा संक्षेप प्रथम ' भगवद्गीता ' व पुढें केवळ ' गीता ' या रूपानें झालेला आपण पाहतोंच. या संक्षेपप्रवृत्तीच्या उलट प्रस्तुत ठिकाणीं ' रामा ' हें लघुतर रूप मागें पडलें आहे. याचें कारण आतां पाहूं.

## ७. षष्ठीचा कार्यप्रपंच

( क ) संस्कृतांतून माहाराष्ट्री किंवा महाराष्ट्री भाषेच्या द्वारां निष्पन्न झालेल्या मराठीच्या प्राथमिक रूपानें अर्थात ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथांत सात विभक्तींपैकीं प्रायः प्रथमा, तृतीया, षष्ठी व सप्तमी या चारच विभक्ति उतरल्या आहेत. पंचमीचा प्रयोग थोडा म्हणून ती येथें विचार्य नाहीं. तेव्हां गळालेल्या विभक्ती ज्या द्वितीया व चतुर्थी त्यांचीं कार्यें प्रथमा व षष्ठी यांवर येऊन पडलीं. पैकीं (१) द्वितीयेचें कांहीं क्षेत्र प्रथमेनें व्यापिलें व (२) उरलेलें द्वितीयेचें क्षेत्र व चतुर्थीचें संपूर्ण क्षेत्र षष्ठीनें व्यापिलें. जसें:– (१) जो **चांदणीयां** गिळी आणि स्वबोधाचा **सुदीनु** करी ( ज्ञा. १६.२ ) येथील अधोरेखित प्रथमा कर्में असल्यानें द्वितीयेचें काम करीत आहेत. (२) पतिचेया **व्रता** पतिव्रता अनुसरे (१६–४५३) येथें व्रता ही षष्ठी द्वितीयार्थक आहे. कैवल्याचेया उवाया यावें ( मोक्षाच्या सुखास यावें ) ( १६-२६८ ), तसेंच **हृदयासि** द्राओ आला ( १–१९१ ), पवनु **मेघांसि** विहे (२–१४), येथें उवाया, हृदयासि, मेघासि ह्या चतुर्थीच्या स्थानीं षष्ठ्या आहेत.

( ख ) क्रियेशीं वस्तूंचीं नातीं व्यवहारांत अनेकविध आढळतात. हीं नातीं व्यक्त करणें हें विभक्तींचें कार्य. पण मोजक्या सात विभक्ति या विविध कार्यांस कोणत्याच भाषेंत पुऱ्या पडत नाहींत. तेव्हां वर्तमान मराठींत साक्षात् विभक्ति रूपांच्या भरतीला, हीं विविध कार्यें व्यक्त करण्यासाठीं, प्रत, लागीं, मुळें, करितां, साठीं, स्तव, संबंधीं, मध्यें इ. अव्ययेंही उपयोजिलीं जातात. हा प्रकार मराठीच्या आद्य ग्रंथांत म्ह. ज्ञानेश्वरींतही आढळतो. ( १ ) वर्तमान मराठींतील उदाहरणें– नगराप्रत, प्रेमामुळें, पोटाकारितां, मोक्षास्तव, व्यवहारासंबंधीं, तळ्यामध्यें, या उदाहरणांत वरील विभक्तिकार्यबोधक अव्ययें **व्युत्पत्तिसिद्ध** अशा **षष्ठीसच** लागलीं आहेत.(२) ज्ञानेश्वरी पाहतां अशा अव्ययांपूर्वीं मूळच्या अपेक्षित विभक्तीचे स्थानीं कधीं षष्ठी आलेली आढळते मजवांचूनि ( १६–३५३ ), ईश्वरावांचूनि

(२–२४२), सूर्या सवें (१३–६०७), ईश्वराकडे (१६–१८८), जन्मा पाठीं (१३–५४१), मोक्षा सगट (= सुद्धां), (१३–१०६९), या उदाहरणांत मूलत: उपपन्न विभक्तिबरोबर षष्ठीहि कोठें–कोठें डोकावते. ह्याच षष्ठीचा उपयोग वाढत जाऊन, कालांतरानें वरील अव्ययें व इतर सर्वच **शब्दयोगी अव्ययें** यांचे पूर्वी चा–प्रत्यय रहित षष्ठी नियमानें एकमेव विभक्ति येऊं लागली.

(ग) विशेषणाची षष्ठी—संस्कृतांत व त्याच्या वळणावर परंपरेनें ज्ञानेश्वरींतही विशेषण विशेष्यानुसार विभक्त्यन्त असते; जसें, **आपुलां**[1] अवसरीं (१६–८६) **थिरावलेनी** अंतष्करणें (१–६१), मागिलें[2] ग्रंथीं (= पूर्वीच्या भागानें १६-२७२) (ऐसां[3] खोलीं[4] डोलां पाहें (१३–१०५१) जुझतीं[5] कुलकेणी (१–११३), तेया[6] प्रभुचें नवल (१–१४२) येथें विशेष्याच्या त्या-त्या विभक्ती पूर्वी विशेषणाची ती-ती विभक्ति आली आहे. परंतु षष्ठीच्यॉ वाढत्या प्रचारामुळें कालांतरानें इतर विभक्तींचे स्थानीं विशेषणाची षष्ठीच वारंवार येऊं लागली जसें:– 'एणें कारणें' चे स्थानीं 'या कारणें'. वर्तमान षष्ठीचा उपयोग निरपवाद होतो. करितां त्याचीं उदाहरणें येथें देत नाहीं.

(घ) कोणत्याहि विभक्तीच्या व्यंजनादि प्रत्ययांपूर्वी म्हणजेच सामान्यरूप म्हणून षष्ठीचा उपयोग.—

ज्ञानेश्वरीकाळीं रामस्य > रामासि या रूपांत, इतिहासदृष्टि मावळून, रामा + सि असे अवयव पाडण्यांत आले, आणि 'रामा' हें विभक्ति–प्रत्यय घेणारें रूप ठरलें. एवढेंच नव्हे, तर प्रत्यय म्हणून गणलेल्या या सि–च्या धर्तीवर अर्थेन > अर्थें > आथें > आतें > तें ह्या प्रत्यय व पुढें ज्ञानेश्वरोत्तर-काळीं लागीं > ला ह्या प्रत्यय रामापुढें लावण्यांत येऊं लागला. आतां येथील 'रामा' ह्या अर्थशून्य अवयव रामस्य > रामस्स > रामास > रामाह > 'रामा या साक्षात् षष्ठीच्या रूपाशीं दिसण्यांत अभिन्न असल्यामुळें, व्यंजनादि विभक्ति–प्रत्यय षष्ठीलाच लागतात, असा अपसमज प्रवृत्त झाला व अशा रीतीनें षष्ठीच्या व्यापांत ही आणखी भर पडली असें मानण्यांत येऊं लागलें. याच (रामासि >) 'रामा' सारख्या रूपास **सामान्यरूप** म्हणून आपण सांप्रत ओळखतों.

**षष्ठीच्या कार्यांचें परिगणन--**

(१) संबंध हा मौलिक सामान्य अर्थ व्यक्त करणें, (२) द्वितीया व चतुर्थी यांचीं कामें पार पाडणें, (३) शब्दयोगी अव्ययांची आकांक्षा पुरविणें, (४) विशेष्यापूर्वीं, त्याच्या विभक्तीकडे लक्ष न देतां, विशेषणाचें रूप सिद्ध करणें, आणि (५) सि, सें इत्यादि व्यंजनादि प्रत्यय, सामान्यरूप या नात्यानें स्वीकारणें इतकीं कामें षष्ठीवर येऊन पडलीं.

**कार्य भिन्न, रूप भिन्न** हा न्याय बोधांच्या स्पष्टतेस पोषक असल्यानें, वरील षष्ठीचा व्याप हलका करणें इष्ट होतें. हें कार्य भाषेनें कसें साधलें, तें आतां पाहूं-

**८. षष्ठीचे संबंधविरुद्ध इतर अर्थ**—वरील उपयोगांमध्यें दोन प्रकार आढळतात. (१) कृष्णा मनीं = कृष्णाच्या मनांत, येथें 'कृष्णा' ही षष्ठी असून उघड-उघड विशेषणाचें कार्य करीत आहे. 'कृष्णा' हें कार्यतः **विशेषण** आहे. (२) इतर सर्व ठिकाणीं षष्ठीचें कार्य विशेषणभिन्न आहे. पैकीं, पहिलें विशेषण कार्य दर्शविण्यासाठीं षष्ठीरूपास 'चा' हा प्रत्यय लावून साधित विशेषण बनविण्यांत आलें. अर्थात् 'कृष्णाचें' हें षष्ठीगर्भ साधित विशेषण ठरतें. याचें अनेकवचनी रूप 'कृष्णाचीं' असें होतें. पुल्लिंगांत वचनानुसार कृष्णाचा, कृष्णाचे अशीं रूपें होतील. यावरून सिद्ध होतें कीं, हें चा-प्रत्ययान्त रूप सर्वथा साध्या आ-कारांत विशेषणाप्रमाणें लिंगवचनांचे विकार पावतें. अशा रीतीनें षष्ठी-बोधित कार्यें कमी करण्याकरितां तिच्या विशेषणतुल्य अर्थासाठीं चा-प्रत्ययांत साधित विशेषण प्रचारांत आलें. अशा रीतीनें अर्थभेददर्शनासाठीं कांहीं क्षेत्रांत **रामाचे** स्थानीं **रामाचा** इ. मोठीं रूपें भाषेनें स्वीकारिलीं आहेत. एतदर्थ इतरही कारण आढळतें.

**९. पोषक कारण**

**विहिरींत** (असलेलें पाणी), **मनीं** (असलेला गर्व) इ. सप्तम्यन्त रूपें अधिकरण दर्शवितात व अर्थात् क्रियाविशेषणतुल्य आहेत. यांच्याकडून अनुक्रमें पाणी व गर्व यांचें वर्णन करविणें तर, त्या दोहोंमध्यें **असलेला** इत्याद्यर्थक **धातुज विशेषण** ठेविलें पाहिजे. याच्या धातुज-बोधित धर्मानें तें मागील सप्तम्यन्तास क्रिया पुरवितें आणि विशेषणबोधित धर्मानें तें पुढील विशेष्याशीं अन्वित होतें. पण मराठी भाषेनें आपल्या संसारांत अशा धातुज विशेषणांचा प्रयोग अनवश्यक मानून, लाघव साधिलें आहे. तें कसें ? 'असलेला' या विशेषणाचा अर्थ मागील सप्तम्यन्त रूपास 'ईल' हा प्रत्यय लावून तिनें सप्तम्यन्तासच साधित विशेषण बनविलें. विहिरींत असलेलें = **विहिरींतील.** वनीं-सारख्या 'ई' प्रत्ययान्त सप्तमीपुढें एतदर्थ 'चा' हा प्रत्यय लागतो. मनीं असलेला = **मनींचा.**

अशा रीतीनें सप्तम्यन्त रूपासच तद्धित प्रत्यय लावून विशेषण बनविण्यांत आलें. सप्तमी मूळची क्रियाविशेषणतुल्य असल्यानें तिला विशेषण म्हणून राबविण्यास तद्धित प्रत्यय लावणें अवश्य झालें, हें ठीकच. पण जन्मतः विशेषण असलेल्या षष्ठीलाही असा प्रत्यय घेण्याचें कारण नाहीं. तेव्हां येथें दिसतें कीं, केवळ शेजारलि सप्तमीच्या साहचर्यानें, वाटल्यास नादानें म्हणा, षष्ठीनें '**चा**' हा प्रत्यय स्वीकारून 'कृष्णाचा' इ. साधित विशेषणें सिद्ध केलीं. अशा प्रकारें सप्तमीचें साहचर्य षष्ठी-गर्भ साधित विशेषणाचें सिद्धीस पोषक झालें आहे.

## १०. 'चा' प्रत्ययाचा उगम

(१) **तत्र** (=तेथें) हें क्रियाविशेषण आहे.

यापासून विशेषण तत्र–त्य (=तेथचा) असें 'त्य' हा तद्धित प्रत्यय लावून होतें. **सत्य**>सच्चा>**सांचा** यांत दिसून येत असल्याप्रमाणें सं. त्य-पासून मराठींत 'चा' येतो. हेंच अधिक काटेकोरपणें देणें तर पुढीलप्रमाणें देतां येईल.

सत्य+क (स्वार्थे)=सत्यक. > सच्चक > सच्चअ > साचअ > साचा. कोणत्याही प्रकारे हें खरें कीं, सं. **त्य** > **च्चा**. (२) तुम्ही काशीहून निघाल्यापासून घडलेलें वृत्त आम्हांस कळलें. =तुम्ही काशीहून निघाल्या**पासूनचें** वृत्त आम्हांस कळलें. अशा ठिकाणीं 'पासून' चा शब्दानें समाप्त होणाऱ्या क्रियाविशेषण-वाक्यांशास चा प्रत्यय लावून विशेषण बनविण्यांत येतें. म्हणजेच, क्रियाविशेषण एकशब्दात्मक असो किंवा वाक्यांशरूपानें बहुशब्दघटित असो त्यास चा-प्रत्यय लावून आपणांस विशेषण बनवितां येतें.

## ११. आक्षेप व समाधान

विभक्ति प्रत्ययांस चरम–प्रत्यय ह्मणतात, अर्थात विभाक्तिप्रत्ययांत रूप आणखी वाढत नाहीं. विभक्तिप्रत्ययापुढें कोणताही प्रत्यय लागत नाहीं. विभक्तिप्रत्ययानें शब्दाची वाढ सर्वस्वी खुंटते. असें असतां कृष्णा–चा मनीं–चा येथें **चा** प्रत्यय कसा लागतो?

उत्तर–विभक्तींचे प्रत्यय वाढीस प्रतिकूल असतात हें पूर्ण सत्य नाहीं. प्रत्यक्ष संस्कृतांतही मामक, माम हे शब्द 'मम' या षष्ठीवरूनच आले आहेत. आस्माक यौष्माक इ. शब्दही अस्माकम्, युष्माकम् या षष्ठीवरूनच निघाले आहेत. तेव्हां षष्ठयन्तापुढें चा प्रत्यय लागल्यास, तें व्याकरणसंकेताच्या सर्वस्वीं विरूद्ध नाहीं.

## १२. 'कृष्णाचा' असलें षष्ठीगर्भ विशेषण संस्कृतांत कां नाहीं?

मामक, यौष्माक इ. विरलतम शब्द सोडल्यास संस्कृतांत षष्ठीगर्भ विशेषण

कां आढळूं नये ? मराठींत तर असलीं विशेषणें षष्ठीच्या नांवाखालीं राजरोस सर्वत्र वावरतात. संस्कृतांत यांची आवश्यकता कां भासूं नये ?

आचामति स्वेदलवान् मुखे ते ( रघु. १३–२१ ) पद्मान्तरें मानसराजहंसी (रघु. ६–२६) येथें **मुखे** ( स्वेदलवाः ) ही सप्तमी विशेषणाचें कार्य करीत आहे. उलट दुसऱ्या ठिकाणीं 'मानसे **या** राजहंसी' असा विग्रह मल्लिनाथ करितो. विग्रहांतील 'या' हें पद असें सांगतें कीं, मल्लिनाथास नुसतीं 'मानसे' ही सप्तमी विशेषण म्हणून संमत नाहीं. याच्या उलट तोच पहिल्या स्थानीं 'मुखे स्वेदलवान्' याच्या स्पष्टिकरणांत वर्तमानान्, जातान् इ. कोणतेंच विशेषण योजीत नाहीं. यावरून उघड होतें कीं, सप्तम्यंतास विशेषण मानण्यास कालिदास अनुकूल आहे, तर मल्लिनाथाची संमति अर्धवट आहे. अशा स्थितींत वैयाकरण काय म्हणतात ?

## १२. व्याकरणाचा अन्तिम निर्णय–

'विहिरींतील पाणी' हा अभिप्राय संस्कृतांत पुढील प्रकारें आढळतो—( १ ) कूपजलम्, ( २ ) कौपं जलम्, ( ३ ) कूपगतं जलम्, ( ४ ) कूपे जलम्. या चार प्रकारांपैकीं पहिले तीन प्रकारच वारंवार आढळतात. यांमुळें कूपे–सारखें सप्तम्यन्त रूप अर्थतः विशेषण मानावें कीं नाहीं, हा प्रसंगच प्रायः संस्कृतांत उद्भवत नाहीं. असा प्रसंग विचारार्थ घेतल्यास मात्र 'कूपे वर्तमानं जलम्' अशा प्रकारें सप्तमीचे पुढें धातुज विशेषण अवश्य प्राप्त होईल. 'कारकाणां क्रियया एव संबन्धः' हा व्याकरणाचा दंडक असल्यानें 'कूपे' या सप्तमीचा 'जलम्' या नामाशीं मुळींच संबंध पोहोंचावयाचा नाहीं. तरी पण, अशा प्रयोगाचें विरलत्व लक्ष्यांत आणून वैयाकरणांनीं सप्तमीचा नामाशीं संबंध मान्य केलेला दिसतो. कारण 'कूपमण्डूकः' याचा विग्रह 'कूपे मण्डूकः' एवढाच देण्यांत येतो. त्यांत 'वर्तमानः' इ. विशेषणांचा प्रयोग करण्यांत येत नाहीं. अशा रीतीनें व्याकरणांत विभक्तीरूपच विशेषण मानण्याचा संकेत ठरला, अर्थात् त्या रूपावरून विशेषण बनविण्याचा प्रसंगच उद्भवत नाहीं. यामुळें संस्कृतांत 'रामाचा', 'घरांतील', 'मनींचा' इ. शब्दांशीं सदृश घटनेनें युक्त अर्थात् विभक्तिगर्भ तद्धित असे शब्द आढळत नाहींत.

## १३. 'रामाचा' या रूपाची व्याकृति–

(१) **'रामाचा'** बाण अमोघ असतो–येथें 'रामाचा' यांत मूळ शब्द राम, विशेषनाम, पुल्लिंग, एकवचन, षष्ठी; यावरून बनलेलें चा-प्रत्ययान्त साधित विशेषण याचें विशेष्य 'बाण' (२) **रामाच्या** बाणानें रावण मेला–येथें 'रामाच्या' यांत मूळ शब्द राम, विशेषनाम, पु. एकवचन, षष्ठी; यावरून बनलेल्या **चा** प्रत्ययान्त साधित विशेषणाचें सामान्यरूप, पुढील प्रथमान्त विभक्त्यन्त 'बाणानें' या विशेष्यामुळें.

## १४. निगमन-

येथपर्यंत आपण पाहिलें कीं, (१) शब्दानें बोधित वस्तूचे (क) पुढील क्रियेशीं नातें म्हणजेच कारक किंवा (ख) पुढील नामाशीं संबंध दाखविणें हें विभक्तीचें कार्य आहे.

(२) 'रामाचा' इ. तथोक्त षष्ठीनें पुढील वस्तूशीं संबंध सांगितला जाऊन आणखी त्या वस्तूचा बोधही अंशतः केला जातो; यामुळें 'रामाचा' इ. रूपास विभक्ति म्हणतां येत नाहीं.

(३) पुढील शब्दानें बोधित वस्तु 'रामाचा' या पदानें सूचित होत असल्यानें त्यास साधित म्हणणें प्राप्त आहे.

(४) 'रामा' हें रूप 'रामस्य' वरूनच बनलें असल्यामुळें इतिहासदृष्ट्या तें षष्ठ्यन्त ठरतें.

(५) या षष्ठ्यन्तासच 'चा' हा साधित प्रत्यय लावून विशेषण बनविण्यांत आलें व हेंच विशेषण षष्ठीचें मुख्य कार्य सांप्रत करितें.

(६) 'रामा' ही ऐतिहासिक षष्ठी पुढील कामें पार पाडितें—विभक्त्यर्थक व इतर शब्दयोगी अव्ययांचें ग्रहण व्यंजनादि विभक्तिप्रत्ययांचा स्वीकार, प्रथमान्त विभक्तींतील विशेष्यापूर्वीं विकार्य विशेषणाचें रूप बनविणें आणि विशेषतः द्वितीयादि विभक्तीच्या प्रत्ययांचें ग्रहण करणें. यांपैकीं शेवटलें कार्य करितांना त्यास सामान्यरूप अशी संज्ञा मिळते.

(७) संस्कृतांत सप्तमी विभक्ति विशेषणाप्रमाणें योजण्यास व्याकरणाचा प्रतिबंध नाहीं.

(८) मराठींत 'रानांत' इ. सप्तम्यन्त रूपें विशेषणवत् योजिलेलीं मुळींच खपत नाहींत. यामुळें त्यांपासूनच 'रानांतील' 'रानींचें' अशीं विशेषणें बनविण्यांत येतात.

(९) या सप्तमीच्या साहचर्यानें 'रानींचा' या धर्तीवर 'रानाचा' असें षष्ठीगर्भ साधित विशेषण बनतें. '**रानाचा**' या रूपास मराठी व्याकरणांत षष्ठी म्हणून मानण्याचा प्रघात आहे.

(१०) तत्रत्य=तेथचा या शब्दांत 'त्य' हा प्रत्यय लागून क्रियाविशेषणाचें विशेषण बनलें आहे. त्य चाच तद्भव मराठींतील 'चा' प्रत्यय होय. हा प्रत्यय लागून 'स्वर्गीं' या क्रियाविशेषणतुल्य सप्तमीचें 'स्वर्गींचा' असें साधित विशेषण

झालें आहे. ‘ स्वर्गीचा ’ हें विशेषण इतिहाससिद्ध षष्ठी ‘ स्वर्गा ’ यापासून बनलें आहे.

( ११ ) विभक्तिरूपापुढें तद्धित प्रत्यय लागणें ही गोष्ट संस्कृतांतही मामक इ., अल्पतम कां असेनात, उदाहरणांत दिसून येते.

( १२ ) सारांश, ‘ रामाचा ’ सारख्या पदानें पुढील शब्दानें बोधित वस्तूचा बोध होत असल्यानें त्यास विभक्ति म्हणतां येत नाहीं. असा बोध विभक्तिकार्यांत कधींच अंतर्भूत व्हावयाचा नाहीं. त्यामुळें विरुद्ध कारणें कितीही आग्रहानें देण्यांत आलीं तरी–व बहुतेक व्याकरणकार अशीं कारणें देतात–‘ **रामाचा** ’ हें रूप षष्ठी ठरत नसून **षष्ठीगर्भ विशेषण**च सिद्ध होतें. एतदनुरूप त्याची व्याकृति मागें दिलीच आहे.

**सूचना**--षष्ठी गळाल्यास, पंचमीनंतर सप्तमी प्राप्त होईल; व अशा रीतीनें विभक्ति–क्रमांत बिघाड होईल; हा टाळणें आवश्यक वाटल्यास मात्र, म्हणजे केवळ **व्यवहारसुखार्थ** रामाचा इ. रूपांस षष्ठी म्हणावें; पण लक्ष्यांत ठेवावें कीं, हीं रूपें तत्त्वतः **षष्ठीगर्भ साधित विशेषणें** आहेत.

---

# खेड

( जिल्हा पुणें )

लेखक–**श्री. य. रा. गुप्ते,**

[ बी. ए., एम्. आर. ए. एस्., सभासद, भा. इ. सं. मं., सभासद, राजवाडे सं. मं. ]

## प्रास्तविक.*

*कांहीं प्राचीन शहरांचा बौद्धकालापासूनचा साधार इतिहास कसा लिहितां येईल याचें दिग्दर्शन करण्यास “ कऱ्हाड ” या पुस्तकाची द्वितीयावृत्ति संशोधकांपुढें ठेविली.

आतां ज्या कांहीं गांवास प्राचीन वा अर्वाचीन इतिहासच नाहीं असा विनाकारण गैरसमज आहे त्यांचासुद्धां पौराणिक कालापासून उपयुक्त इतिहास लिहितां येण्यासारखा आहे याचें एक उदाहरण देतों. तें पुणें जिल्ह्यांतील खेडचेंच—(खेडकडुसचेंच) होय. हें गांव+ निवडण्याचें कारण काय असा साहजिकच प्रश्न पुढें उभा राहील. ज्या गांवाची आपण माहिती लिहितों त्यांत आपलें थोडें दिवस वास्तव्य झाल्याखेरीज त्याविषयीं बारीक सारीक गोष्टी लक्षांत येत नाहींत. शिवाय ज्या ठिकाणीं आपला कांहीं काल जातो त्या स्थानाविषयीं आपणांस प्रेम उत्पन्न होणें हा मनुष्य-

* हा समग्र लेख भा. इ. सं. मं. च्या १७ व्या संमेलनांत वाचण्यांत आला.

\+ पुण्याहून २५ मैल आहे.

धर्म आहे. याचें कारण शोधित बसण्यांत अर्थ नाहीं. पण ही गोष्ट माझेप्रमाणेंच सर्वांच्या अनुभवाची आहे.

या गांवाची मुंबई गॅझिटीअर व्हॉ. १८ भाग ३ यांत दिलेली माहिती अगदींच तुटपुंजी आहे. ज्ञानकोशांतहि तशीच आहे. खेरिज त्यांत कांहीं चुकाहि झालेल्या आहेत. त्या दुरुस्त केलेल्या आहेत. कै. वि. का. राजवाडे,–भा. इ. सं. मं. च्या आद्य आधारस्तंभांपैकीं एक––यांनीं मंडळाच्या श. १८३२ च्या इतिवृत्ताच्या ३९-४० पृष्ठांवर येथील सिद्धेश्वराच्या देवळांतील, त्यापुढील दीपमाळांवरील व पुष्करिणीवरील शिलालेख दिलेले आहेत; त्यांनीं ते निव्वळ डोळ्यांनीं वाचिलेले असावेत. त्यांचे मीं ठसे घेतलेले आहेत. त्यांवरून पूर्वींच्या वाचनांतील कांहीं चुका दुरुस्त करितां येतात व कांहीं मजकूर जास्तहि वाचितां येतो हें आपणांस कळेल. येथील दिलावरखानाच्या थडग्याच्या द्वारावरील फारसी शिलालेखाचें वर्ष गॅझिटीअरमध्यें दिलेलें आहे. पण त्या लेखाचें छायाचित्र प्रसिद्ध झालेलें नाहीं.

प्रस्तुत निबंध मुंबई गॅझिटीअर, व्हॉ. १६, भाग ३ चा पुरवणीभाग समजावा.

## नांव

"खेटका" वरून खेड हें नांव पडलेलें आहे. "खेटका" चें थोडक्यांत उच्चाराव याचें रूप ( Diminutive ) " खेट " होय. खेटाचें प्राकृत रूप खेड हें आहे. हें रूप इतर अनेक गांवांचें आहे हें प्राचीन ताम्रपटावरून व शिलालेखांवरून कळेल. तेव्हां खेटकाचें " खेड " हें रूप नियमास अनुसरून आहे. "खेटक" " खेड " हें क्षेत्र गणिलें जातें. या खेटक क्षेत्राचें वर्णन स्कंद–पुराणान्तर्गत भीमा-महात्म्यात आहे. भीमेस प्राचीन ताम्रपटांतून शिलालेखांतून व माहात्म्यांतून " भीमरथी[1] " संबोधिलेलें आहे. भीमा-माहात्म्य १०–११ व्या शतकांतील दिसतें. त्यांत सिद्धेश्वराच्या देवालयाचें वर्णन आहे.[2] त्यावरून पहातां तें पूर्वकालीन हेमाडपंती धर्तीचें असलें पाहिजे. म्हणजे

---

१ एपि. इंडि. ॲंटि. व्हा. १९ पृ. ३०३, इंडि. ॲंटि. व्हा. ८ पृ. २३, कर्ना. व्हा. १२ प्रस्तावना पृ. ९

२ भां. ओ. री. इ. मध्यें पद्मपुराणान्तर्गत भीमामाहात्म्याची नं. १७२ ( १८८४–८७ )ची हस्तलिखित पोथी आहे. तींत खेटांत सिद्धऋषींनीं सिद्धेश्वर नांवाचें लिंगहि स्थापन केल्याचा उल्लेख आहे. मोठा प्रासाद करून समोर वापी केल्याचें व तींत भागिरथी मुनीश्वरानें आणल्याचें लिहिलें आहे— सिद्धोपि लिंग संस्थाप्य सिद्धेश्वरेति नामतः ॥ प्रासादं सुमहत्कृत्वा कृत्वा वापी तदग्रतः ॥ भागीरथीं समानीय तस्यां वाप्यां मुनीश्वरः ॥ इति श्री ब्रह्माण्ड पुराणे उत्तरखंडे सिद्धतीर्थ महिमा नाम द्वाविंशतिमोध्यायः॥ प. ६७ श्री. पी. के गोडे क्युरेटर व श्री खुपेरकर यांनीं पोथ्या काढून देण्यास मदत केल्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे.

इ. स. च्या १०–११ व्या शतकांतील तें असलें पाहिजे. हेमाडपंती देवळें पूर्व-कालीन कोणचीं व उत्तरकालीन कोणचीं हें ओळखण्याच्या रीति मीं "आमची परळीची यात्रा" या पुस्तकांत लिहिल्या आहेत. जुन्या हेमाडपंती सिद्धेश्वराच्या देवालयाचे अवशेष वर नजरेस पडत नाहींत. ते जमिनींत कोठें गडप झालेले असावेत ! हल्लींच्या सिद्धेश्वराच्या देवळाची माहिती खालीं येईल.

अगदीं जुनें खेड, पेठ जवळची वाडी, खेडच्या बाजूनें पेठचा घाट चढून गेल्यावर माळेगांव लागतें तेथें होतें अशी आख्यायिका आहे. सिद्धेश्वर वगैरे ठिकाणें त्याच्या वाड्याखालीं मोडत. पण आतां प्रकार उलटा झाला आहे म्हणजे खेडची अलीकडची वस्ती मुख्य खेड बनून माळेगांव ही त्याची वाडी झाली आहे!! कालाचा महिमा अगाध आहे.

माळेगांवाहून पेठ ½ मैल आहे. खेडचें प्राचीन बाजाराचें वगैरे ठिकाण तेंच असावें. कदाचित् भीमा महात्म्यांत वर्णिलेलें सिद्धमुनीस मुलविण्यासाठीं वसविलेलें शहर हें असेल. दुर्गा देवीच्या दुष्काळांत बऱ्याच तेलंगी ब्राह्मणांची–ज्यांस हल्लीं देशस्थ म्हणतात–वस्ती पेठच्या आसपासच्या गांवांतून झाली. पेठ कमींत कमी इ. स. च्या १० व्या ११ व्या शतकांतील असावें. कदाचित् त्याच्याहि थोडें अगो-दरचें असणें संभवनीय आहे. कांहीं वर्षांपूर्वी एका गृहस्थास घराच्या भिंतींत ताम्रपट मिळाल्याची वदंता आहे. पण तूर्त तरी या पेंठ खेडच्या प्रकरणावर प्रकाश पाडणारें हें साधन उपलब्ध होत नाहीं याविषयीं वाईट वाटतें.

भोपळे बुवाचा उरूस भरतो ती जागा हल्लींच्या खेडच्या बाजूची सर्वांत प्राचीन समजतात. ऋषी तेथें यज्ञ व तपश्चर्या करीत. तेथें भस्म सांपडतें असें भाविक लोक सांगतात. तथापि हें भस्म म्हणजे प्राचीन जळलेल्या इमारतींची अथवा मृतांच्या चितांची रक्षा नसो म्हणजे झालें! पण जागेंत प्राचीन अवशेष मिळणें शक्य आहे.

खेडची नंतरची वस्ती हल्लीं ज्यास दीक्षितांचा वाडा म्हणतात तेथपासून नदी-पर्यंत होती.

येथील शेवटची वस्ती हल्लींची पेंठ व रस्त्याच्या आणि कचेरीच्या बाजूस झालेल्या इमारती होत. नाला पूर्वी पेंठेच्या बाजूनें वहात असे. पण त्याचा ओघ फिरवून पेठ व तिची मागील बाजू वसविण्यांत आली.

खेडपासून दीड मैलावर तुकाई देवी आहे. तिच्या आसपासच्या घरांस तुका-ईची वाडी म्हणतात. नवरात्रांत तेथें जत्रा भरते. दसऱ्याचे आधले दिवशीं ९ व्या माळेस पहिलें बकरें मारितात व दुसऱ्या दिवशीं म्हणजे विजयादशमीस अथवा

दसऱ्यास लोक देवीसमोर कैक बकरीं मारून घरीं नेतात व प्रसाद म्हणून खातात महाराष्ट्रीय-ज्ञानकोश, विभाग १२ पृष्ठ ११० वर असें आहे:—"तुकाई देवीचें मंदिर तुकाई वाडींत आहे. तेथें महाशिवरात्रीस यात्रा भरते.'' ही ज्ञान-कोश-कारांची चुकी होय. तुकाई देवीची यात्रा नवरात्रांत म्हणजे आश्विनांत भरते. महाशिवरात्रीस यात्रा सिद्धेश्वरीं भरते.

"तुकाई" देवी हें महिषासुरमर्दिनीचेंच रूप असलें पाहिजे; कारण देवीपुढे नवरात्रांत माला लावून उत्सव करितात व महिषासुरमर्दिनी पुढें मारितात तशी तुकाई समोर बकरीं कापितात.

तुकाई नांव पडण्याचें कारण पुजारी वगैरे खालीलप्रमाणें चमत्कारिक देतात. "तूं कां इथें आलीस" असें पार्वतीस श्रीरामचंद्रानें विचारिलें म्हणून देवीचें नांव तुकाई पडलें.

या देवीचें मंदिर खेड नव्हतें तेव्हांचें आहे असें म्हणतात. या मंदिराच्या खांचाचें वर्णन गॅझीटीअरमध्यें असें दिलेलें आहे:—

"खांब ओबड धोबड व भरभक्कम आहे, मध्यें चौकोनी, पुढें अष्टकोनी, नंतर चौकोनी असून नंतर कड्यांची ओळ आहे. सर्वांच्यावर चौकोनी स्तंभशीर्षतल त्यावर लठ्ठ शीर्ष आळ्यांत बसविलें आहे. त्यांतून चार नक्षीचे भाग पुढे आलेले आहेत.* गॅझीटिअरांत न दिलेलीं मोजमापें देऊन देवालय बांधण्यांत आलें त्या कामाचा अंदाज देतों.

देऊळ हेमाडपंती देवळाची अर्वाचीन नक्कल आहे. धर्ती हेमाडपंती आहे. पण खांबास चुना वगैरे लाविलेला आहे. मंदिर बरेंच ओबडधोबडच आहे. तें इ. स. च्या १५ व्या १६ व्या शतकांतील दिसतें. कऱ्हाड येथील विरोबाच्या देवळाच्या हुबेहुब धर्तीवर हें उभारलेलें आहे. पण त्यापेक्षां बरेंच हें मोठें आहे.

देवी स्वयंभू समजतात. तुळजापुरच्या भवानीचेंच हें स्थान आहे असें मानितात. प्रेक्षकाच्या उजव्या हातास व स्वयंभू देवीच्या डाव्या हातास तिची प्रतिमा आहे. ती मंदिराच्या वेळची आहे असें सांगतात. हीहि १५ व्या १६ व्या शतकांतील दिसते. कदाचित् किंचित् त्याच्या अगोदरचीहि असेल.

---

* "The pillars are rude and massive; square about the middle, then eight sided, then four sided, and then a series of rings surmounted by a square abacus which is tapped by a heavy head-piece with four projections." Bombay Gazetteer, vol XVIII, Part iii. p. 242.

गाभाऱ्याची लांबी व रुंदी सारखी असून ती १६½′ × १६½′ आहे. उंची जमिनीपासून १०′ आहे. त्या पुढील मधील भाग २०′ × २०′ आहे. दोन्ही बाजूस ओऱ्या आहेत. त्यांची लांबी १२½′ असून रुंदी ८½′ आहे.

देवी पुढील मंडप ३१½′ × ३१½′ असून पुढील भाग ( Porch ) १०¾′ × ८¾′ आहे. मंडपाच्या आंतील बाजूस सभोंवार दगडी बांक आहे, तें २½′ रुंद आहे. मंडपाची उंची दगडी फरशी पासून ८′ आहे.

तुकाईवाडीस निदान १९१ वर्षे वस्ती आहे असें कागपत्रावरून सिद्ध होतें. हल्लीं तेथें ९ घरें असून लोकसंख्या ७० आहे.

श्रीराम, लक्ष्मण व सीता यांच्या मूर्ति सुमारें ३४१ वर्षांच्या जुन्या असून वालुकेच्या आहेत. त्या श्री भीमरथींत सांपडल्या. त्या पूर्वी एक गोसावी गुरांच्या वाड्यांत पूजीत असे. तो समाधिस्थ होतांना त्यानें त्या खेडकर जोशांच्या स्वाधीन करून त्यांस त्यानें त्यांची पूजा करण्यास निरविलें. त्यांसाठीं एक अगदीं लहानसें देवालय बांधण्यांत आलें. पुढें निजामच्या राज्यांतील एका मराठे सरदारावर निजाम सरकारची इतराजी होऊन तो खेडास आला. पूर्ववत् सरकारची मर्जी सुप्रसन्न होऊन पूर्वपद प्राप्त झाल्यास पूजा नैवेद्याची व्यवस्था करीन असा त्यानें प्रतिमांस नवस केला. सर्व गोष्टी मनाप्रमाणें झाल्यावर त्यानें त्यांस वर्षासन करून दिलें. तेंच पुढें चालूं राहिलें. अहिल्याबाई होळकरीण हिनें लहानसें देवालय, मंडप व पायऱ्या बांधिल्या. पण अगदीं अलीकडे ९०।९५ वर्षांपूर्वी वर्गणी गोळा करून रा. शहाणे मामलेदारांनीं जुना माल मसाला उपयोगांत आणून देवालय बांधिलें व मंडप उभारिला. हल्लीं खेड तिजोरींतून देवास पूजानैवेद्याबद्दल रु. ६० वर्षासन मिळतें.

रामाचे देवळाजवळील त्याचे पूर्व दिशेचा घाट—ज्यास रामघाट म्हणतात तो—कऱ्हाडे ब्राह्मण बर्जे यांनीं बांधिला. तो पेशवाईचे अगोदरचा आहे. बर्जांचा हल्लीं निर्वंश आहे.

हल्लींच्या सिद्धेश्वराचे देवालयाजवळीकडे भीमा दक्षिणवाहिनी झाली आहे. तेथें बारा वर्षांनीं क्षौर वगैरे करितात. श्रीगंगाजी तीस तेव्हां भेटावयास येते अशी समजूत आहे. एरव्हींहि दक्षिण वाहिनीवर क्रिया वगैरे करितात. भीमेस म्हसेवाडीचे बाजूनें उतरण्यास घाट बांधिलेला आहे. तो पेशवाईचे अगोदरचा आहे. पण कोठें नक्षी काम नसल्यामुळें व लेख नसल्यामुळें त्याचा नक्की अंदाज करण्यास साधन नाहीं.

खेडचे बाजूनें पेठेचा घाट चढावयास लागतांच डाव्या हातास खालील ओढ्या लगत सटवाईचें देऊळ आहे. तें अंदाजानें तुकाईचे देवळाचेच वेळचें आहे. तेथें मुलें होण्यासाठीं नवस करितात व मुलगा झाल्यास त्याचे जायवळ काढितात.

घाटांत त्याच सुमारास लमाण बुवाचें ठिकाण आहे. हा लमाणबुवा गाड्या अडवितो व पाडतो व माणसांस सायंकाळी आडवा येतो असा एक अडाणी लोकांत समज आहे. याचें कारण बहुधा असें आहे कीं घाटांतील वळणामुळें व उतारामुळें हें धोक्याचें ठिकाण आहे. तेथें पुष्कळ वेळां अपघात होत व होतात.

खेडास दिल्ली दरवाजाजवळ व नाल्यापासून जवळच दिलावरखानाचें थडगें आहे. त्याचें पुराणवस्तुसंशोधन खात्यामार्फत संरक्षण केलें जातें. या खात्याची तेथें काळी पाटी आहे. पण तीवरचीं ठराविक वाक्यें पार धुऊन पुसून गेलेलीं आहेत.

महाराष्ट्रीय—ज्ञान—कोश वि. १२ पृ. १०९ वर "येथें (खेडास) १६१३ सालीं बांधलेलें मोंगल सेनापति दिलीरखा ह्याचें थडगें आहे" असें लिहिलें आहे. पण मुं. गॅ. व्हॉ. १६ भाग ३ पृ. २४१ वर ह्याचें नांव "दिलावरखान" आढळतें.

थडग्याचे द्वारावरील शिलालेखांतहि "दिलावरखान" असेंच नांव आहे. वर्ष हिजरी १०२२ (म्हणजे इ. स. १६१३) हें आहे. हा दिलावरखान जहांगीर बादशहाचा समकालीन होता. त्याच्या थडग्याच्या शेजारचें थडगें त्याच्या भावाचें आहे. वरील शिलालेखाचा मीं ठसा घेतलेला आहे. त्यावरून लेखाचीं अक्षरें फार सुबक कोरलेलीं आहेत हें दिसून येईल. फुलाच्या मधील ओळींत कलश्याचा भाग आहे. खालीं परशियन (फारशी) भाषेंत लेख आहे. तो बाळबोधींत असा लिहितां येईल: रहमते हक शुद बर खजां दिलावरखां मुकाम दरम्यानी मिसर बागे बीं बहक जुई मुदाम, याचें भाषांतर भा. इ. सं. मं. चे मुनशी यांच्या साहाय्यानें केलेलें असें आहे:—

ज्याप्रमाणें शहरांतील बागेंत पाट नेहमीं वाहात राहतो त्याप्रमाणें दिलावरखानाची जागा (कबर) व त्याचा आत्मा यांवर परमेश्वराची कृपा वाहो (राहो.)

या थडग्याच्या इमारतीचें वर्णन थोडक्यांत गॅझिटीअरमध्यें केलेलें आहे तें असें:—

दिलावरखानाचें थडगें व मशीद यांभोंवतीं मोठी शेतीची जमीन असून सभोंवार भिंत आहे. पवित्र स्थानावर घुमट असून तें उंच आसनावर बांधलेलें आहे. त्याच्या वरील भागावर सभोंवार हालती पुष्पमाला कोरलेली आहे. बाहेरील बाजू चौकोनी असून प्रत्येक कोंपऱ्यांत मनोरा आहे. चारी भिंती तीन तीन मोकळ्या कमानींच्या दुहेरी रांगांनीं सुशोभित केलेल्या असून वरच्या श्रेणीवर बारीक अणीदार कमानीची झालर आहे. पवित्र जागेंत दिलावरखान व त्याचा बंधु यांचीं थडगीं असल्याचें सांगतात.*

---

* "They (Dilavarkhan's tomb and mosque) are surrounded by a wall enclosing a large plot of land most of which is under cultivation, The shrine is domed and

(पान ६४ पहा.)

गॅझीटिअरांत मोजमापें दिलेलीं नाहींत तीं देतों व इतर माहिती नाहीं ती देतों. थडग्याच्या शेजारची मसजिद यांच्या भोंवतालच्या भिंतीची लांबी ४४५ फूट असून रुंदी सुमारें ३४५ फूट आहे. मुख्य दरवाजा दक्षिणेकडे आहे. लहान द्वारें पूर्वेकडून दोन आहेत. त्यांवर कमान आहे. उत्तरेकडे दक्षिण दरवाज्याच्या समोर एक दार आहे. त्यावर चौकट आहे. पश्चिमेस एक द्वार आहे. सभोंवतालच्या भिंतीच्या चारी बाजूस लहान लहान बुरूज आहेत.

थडग्याचा चबुथरा ४७″६′ × ४७′. ६″ असून वरील भाग २७′ ६″×२७′ ६ उंची आहे.

थडग्याच्या पश्चिम दिशेस एक जुनी थोडीशी पडित मसजिद आहे तिचें काम सुबक आहे. दगड साधारण घोटीव आहेत. या मसजिदींत किंचित दिल्लीच्या पठाणांच्या इमारतींची झांक मारते.

मसजिदीच्या चबुऱ्याची रुंदी २८′ असून लांबी ५६′ ६″ आहे. वरील मसजिदीची लांबी ३५′ ९″ असून रुंदी २५′ ३″ आहे. मागच्या बाजूचा भाग पश्चिमेकडे वाढविलेला आहे. चबुथऱ्याचा ३′ × ९′ ३″ असून वरील २′ ९′ × ६′ ९″ आहे. चबुतरा जमिनीवर ४′ ६″ आहे. मसजिदीची उंची चबुतऱ्यापासून १७′ ९″ आहे. मसजिदीच्या गच्चीपासून घुमटाच्या टोंकापर्यंतची उंची सुमारें १३′ फूट आहे.

दिल्ली दरवाजानें मोटार स्टॅण्डकडे जातांना डाव्या हातास एक मसजिद लागते. ती पूर्वीं गाडली गेलेली होती. कुंपण साफ करितांना फक्त तिच्या भिंती दिसल्या. पुढें मुसलमान लोकांनीं वरील लांकडी काम वगैरे केलें.

या मसाजिदी समोरील रस्त्याचे पलीकडील बावली म्हणजे पायऱ्या असलेली विहीर जुनी आहे. ती घुमटाचे वेळची आहे म्हणतात.

खेडाहून पेंठेच्या बाजूस जातांना मोटारअड्यापासून २ फर्लांगावर एकवीरेचें देवालय आहे. तें याच सुमाराचें दिसतें.

---

( पान ६३ वरून पुढें चालू )

built on a raised platform, the upper part of which is ornamented all round with a hanging wreath of sculpture follows. The outside is quadrangular with a minaret flanking the dome at each corner. The four walls are adorned each with a double row of three blank arches in the upppr row being minutely cusped. The shrine coutains two-tombs said to be of Dilawarkhan and his brother.–Bombay Gazetteer, vol, XVIII, Part III.

हल्लींचें सिद्धेश्वरचें देवालय काशीकर मधवे यांचे पूर्वज त्र्यंबक यांनीं बांधिलें. त्यांचे नांव दोन शिलालेखांत आहे.

श्री

द्वारावरील शिलालेख असाः—

[ १ ] ॥ सिद्धेश्वरस्यालयमत्रपूर्ण ॥

[ २ ] ॥ गुरौ मघावादि तिथौ च खेटे ॥

[ ३ ] ॥ विश्वावसौ सप्तयुगर्तु भूमौ ॥

[ ४ ] ॥ कर्ता वणिगू(क्) त्र्यंबकमध्वनामा ॥

अर्थः—खेटांत म्हणजे खेडगांवांत येथें सिद्धेश्वराचें देवालय शके १६४७ त विश्वावसु संवत्सरांत पुरें झालें. हें बांधणारा व्यापारी त्र्यंबक मध्वा नांवाचा होय.

या व्यापाऱ्याचे वंशज हल्लीं खेडास अद्यापि सुस्थितींत असून त्यांचें आडनांव "मध्वे" असें आहे. त्यांस काशीकर या उपनामानेंहि संबोधितात. देवालय बांधिल्यावर कालांतरानें त्र्यंबकाचे वंशजाची स्थिति खालावली व तो श्रीक्षेत्र काशी येथें राहावयास गेला. पुढें तो सधन झाला व खेडला परत आला. येथें आल्यावर तो क्षेत्र काशीहून आला यास्तव त्यास काशीकर म्हणूं लागले. त्याचे वंशजास काशीकर हें द्वितीय उपनाम रूढ झालें. हे काशीकर लिंगाइत आहेत.

द्वाराचे उंबऱ्याजवळील दगडाचे फरशीवरील लेखः—

॥ वेंकाजी बाबाजी ॥

कदाचित् हें गवंड्याचें नांव असेल.

कुंडाचे—भागीरथीचे—नैर्ऋत्येचा शिलालेख पाणी वाहून वाहून फारच खराब झालेला आहे. ज्यावर तो खोदिला आहे तो दगडहि चांगल्या जातीचा नाहीं. लेख असाः—

[ १ ] [ स्वस्ति ] श्री रघच कावसौ ...

२ ] ... राक्षेस नाम संवछरे ... ...

[ ३ ] [ वणि ] क श्री त्र्यंबक सेट मध [ वे ]

[ ४ ] [ गचला ] उरला करणें जालात

[ ५ ] हे मा [ हे ] कार्तिक शु ॥ ७

[ ६ ] चा

[ ७ ] णी छ

[ ८ ] रेस घ

[ ९ ] पा श्री के

[ १० ]

[ ११ ] १छ रसा

कै. राजवाडे यांनीं ४ थ्या ओळींत प्रथमच रचिला वाचिलें आहे. पण हल्लीं तरी ठशावरून सुद्धां हा शब्द वाचण्यास अवसर नाहीं. ठशावरून कांहीं जास्त अक्षरें वाचितां येतात. पण तीं अगदींच थोडीं असल्यामुळें अर्थबोध होत नाहीं.

सिद्धेश्वराचे देवालय बांधणार त्र्यंबक मध्वे याचे वंशज रा. बळवंत बाबाजी मध्वे यांनीं आम्हांला आपल्या येथील एक जुनें टिपण आणून दिलें. त्यांत सिद्धेश्वराचे देवालय शके १६४७ विश्वासु नाम संवत्सरे चैत्र शु ॥ १ रोज गुरुवार* या तिथीस समाप्त झाल्याचा उल्लेख आहे. तसेंच +त्यांत देवळा समोरील कुंडाचें काम शके १६५७ राक्षस नाम संवत्सरे कार्तिक शु ॥ ७ रोजीं पुरें झाल्याचा दाखला आहे. या कुंडास भागीरथी म्हणत व म्हणतात. वरील टिपणांतहि "भागीरथीचें काम" असेंच लिहिलेलें आहे.

कुंडाचे पश्चिमेस धर्मशाळा आहे. तिची लांबी ५८ फूट असून, रुंदी उंची ८ फूट आहे. पुष्करणीच्या ओवरीच्या पहिल्या खणाच्या भिंतीवरील लेख छिन्नविच्छिन्न आहे. नीट लागत नाहीं. अक्षरे २०० वर्षांपूर्वीचीं बालबोध आहेत असें कैलासवासी राजवाडे म्हणतात.

मी या लेखाचे ठसे घेतले. पण त्यावरूनहि फक्त खालील अक्षरें वाचितां येतात.

रयाचे
राणी यांत्त
य. गोपा
णावाभं
पा म
राया
ण व राम
छवछरे

देवालयाजवळील पहिल्या दीपमाळेवरील लेख असा:—

[ १ ] श्रीसिद्धेश्वरचरणिरत र.
[ २ ] घोजी †चव्हान दिपमाळ प[ङ्क्ति]
[ ३ ] त शके १६९५ §विलंब नाम संव-

---

* ४ मार्च १८२५ इ.

+ १२ ऑक्टोबर १७३५ इ.

† चव्हान डोळ्यांनीहि स्पष्ट दिसते. राजवाडे यांनीं "विरचित" वाचलें आहे.

§ पण संवत्सर विजय येतो. तो धरून ता. ३० आक्टोबर १७७३ येते

[ ४ ] त्सर कार्तिक मास शुद्ध ५

[ ५ ] स बुधवासर मूळ नक्ष.

[ ६ ] त्र प्रारं [ भः ] सिद्धेश्वर

[ ७ ] [ प्रसन्न ]

¶

कै. राजवाडे यांनीं २ ऱ्या ओळींत चवान शब्द वाचिला आहे. पण तेथें चव्हान ( चव्हाण ) आहे. या दीपमाळेस " चव्हाणाची दीपमाळ " असे अद्यापि लोक म्हणतात. २ ऱ्या व ३ ऱ्या ओळींत विराचित वाचिलें आहे. ४ थ्या ओळींत " सुध असें कै. राजवाडे यांनीं वाचिलेलें आहे. पण ठशावरून " शुध " असें दिसतें. ६ व्या ओळींत त्यांस नुसत्या डोळ्यांनीं " त्र " एवढेंच अक्षर वाचितां आलें. पण ठशावरून " प्रारंभः सिद्धेश्वर " हे शब्द उघड दिसतात. ७ व्या ओळींतील शब्द " प्रसन्न " असावा. तथापि त्याची खात्री देववत नाहीं.

पुढील दीपमाळ एका नायकीणीनें उभारिलेली आहे. तीवर लेख नाहीं. त्या नाय-किणींचें नांवहि कळत नाहीं. पण तीस नायकिणीची दीपमाळ म्हणतात.

पुढील दीपमाळ सांडभरांनीं बांधिलेली आहे. तिचा वरचा भाग तुटला होता. तो नवा घातला आहे. तीवरील लेख असा.

[ १ ] श्रीधेश्वर ( सिद्धेश्वर )चे (च)रणी

[ २ ] आबाजी सांडभ [ – ]

[ ३ ] र याची दीपमाल

[ ४ ] आसे सक १७५९$

कै. राजवाडे यानीं सिद्धेश्वर चरणि आबाजी बाजीव + + र याची दीपमाल + + समत १७५९ असें वाचिलें आहे. तथापि " सांडभर " हें नांव स्पष्ट आहे. खेडची पोलीस पाटीलकी सांडभरांची आहे. शिवाय ते याच दीपमाळेवर पणत्या लावितात. तेव्हां त्यांचे नांवाविषयीं संशय नाहीं. कै. राजवाडे " समत " असा शब्द वाचि-तात. पण संवत् इकडे बहुधा घालीत नाहींत. तो उत्तर हिंदुस्थानांतील लेखांतून येतो. शिवाय " क " हें अक्षर स्पष्ट आहे.

पुढील दोन दीपमाळी थिगळे यांच्या आहेत.

कुंडाचें काम सुमारें १० वर्षें चाललें होतें असें सांगतात. त्याचा साधारण पाणी रहाण्याचा भाग ५५′ ६″ × ५५′ ६″ आहे.

---

¶ भा. इ. सं. मं. अहवाल शके १८३२.

$ १८३७–८ इ.

सिद्धेश्वराच्या जवळच्या दोन धर्मशाळा———एक मंडपाच्या पूर्वेस व देवालयाच्या ईशान्येस असलेली आणि हल्लीं नगारा असलेली व दुसरी जी देवालयाच्या मंडपाच्या पश्चिमेस व देवालयाच्या वायव्येस आहे ती व जींत विटा वगैरे सांठविल्या आहेत ती—नाना फडणविसांनीं बांधिल्या. त्यांनीं देवालयाच्या पूजेअर्चेस कांहीं इनामहि करून दिलें. यासंबंधाचे लेख रा. लक्ष्मण तात्याजी खेडकर यांचे जवळ असल्याचें तें सांगतात. पण ते अद्यापि हातीं आलेले नाहींत.

वर निर्दिष्ट केलेल्या दुसऱ्या धर्मशाळेच्या + भिंतीवर चुन्यांत चित्रें काढिलेलीं आहेत. त्यांत मच्छ, कच्छ, वराह, नारसिंह, वामन, परशुराम व राम हे विष्णूचे अवतार सहज ओळखितां येतात. तेव्हां बाकीचे तीन अस्पष्ट झाले आहेत असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं. नारसिंह अवताराच्या खालील दोन प्रतिमेपैकीं प्रेक्षकाच्या डावीकडील प्रतिमेच्या अंगांत नाना फडणवीस, सखाराम हरी वगैरे पेशवाईतील पुरुषांच्या अंगांत अंगरखे असत तसा हुबेहुब आहे. वामन अवताराच्या खालील देवळींत मोरावर श्रीसरस्वती असून प्रत्येक बाजूस एक पादचारिक आहे. रामावताराच्या खालील कोनाड्यांत गरूड आहे. नारसिंह अवताराच्यामध्यें महिषासुरमर्दिनी आहे. महिषाचें तोंड खालीं पडलेलें दाखविलें असून राक्षसांच्या डोक्यांचे केंस देवीनें खालच्या उजव्या हातांत धरले आहेत व खालच्या डाव्या हातानें रेड्याचें शेपूट धरलें आहे. वरील उजव्या हातांत त्रिशूळ असून वरील डाव्या हातांत तलवार आहे. २ फर्लांगावर त्याच्या वायव्येस सिद्धेश्वराच्या पादुका आहेत. त्यांची आख्यायिका अशी आहे कीं, सिद्धेश्वर त्र्यंबक शेट मध्वे यांस घालविण्यास रात्रीं या पादुकांपर्यंत येत. पुढें गांवाची हद्द जवळ असल्यामुळें ते गुप्त होत अथवा परत जात.

महाशिवरात्रीस सिद्धेश्वरीं जत्रा भरते. त्यावेळीं त्यांची पालखी निघते.

श्री सिद्धेश्वरांस सरकारांतून नक्त नेमणूक पूजा नैवेद्याकरितां दरसाल रु. ७६ व नंदादीपासाठीं दरसाल रुपये २० मिळतात. नित्य नैमित्तिक खर्चाकरितां चार-जमिनी इनाम आहेत.

सिद्धेश्वराचे पलीकडे कालभैरवाचें एक लहानसें देवालय आहे. तें माळी लोकांनीं बांधिलें. कालभैरवाचा उत्सव खेडचे माळी लोक मार्गशीर्ष व॥ १४ स करितात.

कचेश्वर बाबा, थोरले शाहु छत्रपति यांचे गुरु, हे चाकणास रहात असतां चांडोली नजीक खेड येथील दक्षिणवाहिनी नजीकच्या विठ्ठल मंदिरांत ध्यानस्थ बसत असत येथेंच राजमाता जिजाऊसाहेब यांनीं दक्षिणवाहिनीवर स्नान केल्यावर शिवाजी महाराजांसह सिद्धेश्वरबावांची भेट घेतली. होती बावांनीं शिवाजीस पुढें राज्यप्राप्ति होईल असें भविष्य केलें होती. येथेंच शाहु महाराज कचेश्वर बाबांस भेटले व येथेंच

+ हल्लीं दोन्ही धर्मशाळा पडल्याचें एकतों.

त्यांनीं त्यांस राज्यप्राप्तीविषयीं प्रश्न विचारिला. येथेंच महाराजांस आशीर्वाद मिळाला. कै. पारसनीस म्हणतात, त्याप्रमाणें तो चाकणास मिळाला नाहीं. सविस्तर हकीगत माझ्या सहविचारांतील लेखांत वाचण्यास मिळेल. ज्या शेतांत हें विठ्ठल मंदिर आहे त्याचें नांव* इनाम आहे.

इ. स. १७०८ त श्री. थोरले शाहु महाराज ताराबांईच्या फौजा चाकणावर आल्या होत्या त्यांस विरोध करण्यास खेडास प्राप्त झाले व त्यांनीं आपला मुक्काम सिद्धेश्वरा-नजीक ठेविला. त्यावेळीं येथें गर्द छाया असून राजे लोकांस उतरण्यास हें योग्य स्थल होतें. शिवाय सिद्ध मुनींनें आपल्या तपोबलावर व सद्वर्तनावर येथें जय मिळविल्याची कथा असल्यामुळें व शाहुमहाराजांस सिद्धि, जय, मिळविणें असल्यामुळेंहि कदाचित् त्यांनीं हें ठिकाण पसंत केलें असेल. कांहीं असो. सिद्धेश्वरीं राहून पाटील वगैरे मंडळी आपल्या पक्षास मिळवून घेण्याची पराकाष्ठा त्यांनी चालविली. पण या लोकांस एकीकडे आड तर दुसरीकडे विहीर असें झालेलें होतें, तेव्हां ते वेळ पडेल तसें वागून ताराबाई व शाहु या दोघांसहि खुष ठेवण्याचा प्रयत्न करीत होते.

महाराजांनीं खेडच्या सातकर पाटलांस बोलावूं पाठविलें. पण तो पूजेचें ढोंग करून चुकवाचुकवी करूं लागला. महाराजांची तरुणपणची पहिली तडफ फार भयंकर असे. पुढील प्रतिनिधींचे डोळे काढिण्याचा हुकूम सुप्रसिद्धच आहे. असो.

सातकर पाटलास पैजारा म्हणजे जोडे मारीत आणण्याचा हुकूम सुटला. त्याप्रमाणें त्यास आणण्यांत आलें. त्यावेळीं स्वारी पेंठच्या रस्त्याच्या बाजूस गेलेली होती. सातकर पाटलाची स्त्री नवऱ्याच्या मागोमाग गेली व तिनें नवरा मारानें छाती फुटून मरेल म्हणून आकांत मांडिला. महाराज सांबाचा अवतार! ज्या शेतांत सातकर पाटलास पैजारा मारीत आणिला तेंच चारा बिघ्यांचें शेत त्यांनी त्याच्या स्त्रीस चोळी बांगडीस इनाम करून दिलें. तें हल्लीच्या स. नं. ११५१ चें होय. त्यास अद्यापि "पैजारपट्टी" म्हणतात.

ताराबांईच्या फौजा व शाहूच्या फौजा इ. स. १७०८ त लढण्याचें तोंड भीमा-तीरीं येथेंच लागलें. जय मोशीच्या टेंकानजीक १३ व्या मैलाजवळ येऊन ताराबाई-पक्षाचे लोक छ. थो. शाहू महाराज यांस शरण आले.

नदीकांठीं राजगुरूंचा वाडा लागतो. दुरून हा किल्याप्रमाणें भासतो. हे राजगुरू श्री थोरले शाहुछत्रपतींचे गुरु कचेश्वर बावा यांचे वंशज होत. ह्या वाड्याचा पुढील भाग कचेश्वर बावांचे वडील चिरंजीव देवराव यांच्या हयातींत उभारण्यांत आला, व मागील धाकटे मुलगे जगन्नाथ यांचे विनंतीवरून महाराजांच्या सुमारें एक लाख रुपयांचा देणगीनें बांधण्यांत आला. यांत कचेश्वर बावा पूजित होते

* **सहविचार**, वर्ष ७, अंक २, ऑक्टोबर १९२८ पृ. ८३-९०

ती विष्णूची मूर्ति होती. ती हल्लीं पुण्यास आहे. वाड्याचे भाग पाडून त्याच्या मालमसाल्यानें नवा वाडा अलीकडे वाकीस बांधण्यांत आला. खेडचे राक्षेवाडींत श्रीमंत होळकर वाफगांवास जात तेव्हां त्यांचे हत्ती उतरत. त्या जमीनीस हत्तीणपट्टी असें अद्यापि संबोधितात.

शेतांच्या नांवावरून ऐतिहासिक माहिती मिळूं शकते. खेडाच्या पैजारपट्टी व हत्तीणपट्टी या नांवांवरूनहि तेंच सिद्ध होतें.

खेडचें नांव उच्चारितांच चण्डीराम महाराजांची आठवण होत नाहीं असे लोक विरळा. तेव्हां खेडाचे माहितींत त्यांची हकीकत थोडक्यात देणें अनिवार्य आहे.

चण्डीराम महाराज देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण. त्यांचें घराणें अहमदनगर जिल्ह्यांतील अकोल्याचें रहाणारें. त्यांच्या पित्याचें नांव केशवभट व मातोश्रीचें राधाबाई. हें जोडपें फार सत्वस्थ असून ईश्वर भजनांत दंग असे. त्यास दोन कन्या रत्नें होऊन त्यांचीं लग्नें झालीं. पण पुढें पुत्राशिवाय परलोकीं गति नाहीं असा त्यावेळीं समज असल्यामुळें केशवभट नासिक जिल्ह्यांतील सप्तशृंगीस गेले व तेथें त्यांनीं एक वर्षपर्यंत चण्डिकेची उग्र आराधना केली. पुढें देवी सुप्रसन्न होऊन राधाबाईच्या माहेरीं धांधरपकळी शके १६९४ फाल्गुन शु॥* २ स पुत्र झाला. तो चण्डीच्या प्रासादानें झाला म्हणून व त्याचे दर्शनानें रमणीयता प्राप्त झाली एतदर्थ त्याचे नांव मातापितरांनीं "चण्डीराम" ठेविलें. १० व्या वर्षी त्याचें संगमनेरच्या सराफ घराण्यांतील मुलीशीं त्याचें लग्न झालें. जोशीपणाच्या वृत्तीवर त्याचा निर्वाह चालें. एके दिवशीं त्याच्या वृत्तीच्या गांवांतील पाटील मृत्यू पावला. दानधर्म करण्यास चण्डिरामानें सुचविलें. तेव्हां "आम्हीं दुःखांत आहों आणि मटास दक्षिणा सुचली आहे" असा पाटलाच्या स्त्रीनें टोमणा मारिला.

नंतर चण्डीरामबोवांस ते शब्द झोंबून त्यांनीं आपल्या घरावर + तुळशपित्र ठेविलें, तें ब्राह्मणाकडून लुटविलें व ते भिक्षा मागून आपला उदरनिर्वाह करूं लागले.

पुढें संगमनेरास त्यांनीं शेषाद्रि महाराजांस आपले गुरू केलें. शके १७२८ त त्यांनीं अकोलें कायमचें सोडिलें व ते प्रवास करूं लागले. ते कधीं चासेस असत, कधीं निमगांवीं जात तर कधीं खेडास रहात.

त्यांचें गुरु शेषाद्रि महाराज समाधि घेण्यास श्री क्षेत्र नाशिक येथें जाणार होते. पण प्रकृति फार बिघडल्यामुळें भीमातटाकीं नासिकच्या रस्त्यावरच खेडास ती घेण्याचें

---

* २३ फेब्रु. १७७३ इ.

+ चण्डीरामांचें घर अकोल्याचें गांवांतून प्रवरेस जातांना उजव्या हातास निदान इ. स. १९३७ पर्यंत होतें.

त्यांनीं निश्चित केलें. *त्यांनीं येथें शके १७३२ माघ वद्य ४†स वैकुंठवास केला. पुढें चण्डीराम महाराजांस गुरुसमाधि सन्निध खेडासच केदारेश्वराचे मागें रहावेसें वाटूं लागलें. ते बसत त्या ठिकाणास पर्णकुटिका अथवा मठ म्हणत. तीवर हल्लीं रा. शंकरराव दीक्षितांनीं एक कौलारू छप्पर उभारिलेलें आहे. खेडच्या माळावरच्या दीक्षितांनीं जागा दिल्यावर चण्डीराम महाराजांनीं ब्रह्मेश्वराचे देवळाजवळ व गुरूच्या समाधिनजीक आपला मठ आणिला. विष्णूचे मंदिरामागें ते बसण्याची खोली दाखविण्यांत येते. श्री विष्णुचे खालीं गुहा आहे तेथें ते ध्यानस्त बसत.

श्री विष्णूची मूर्ति स्फटिकाची असून अत्यंत सुबक कोरलेली आहे. प्रथम ती वडुथ मुक्कामीं यमाजीपंत दाणी यांचे संग्रहीं होती. ती महाराजांनीं स्वत: आणून तिची स्थापना खेडास शेषाद्रि महाराजांचे समाधिमागें व ते ध्यानस्त बसत त्या गुहेचे वर शके १७३४ त गवती छपरींत केली. महाराष्ट्रीय-ज्ञान-कोष, वि. १२ पृ. ११० वर "भीमेच्या कांठीं चण्डीरामबुवानीं बांधलेलें विष्णुचें देवालय आहे" असें लिहिलें आहे. हें माधवराव रास्ते यांनीं बुवांस बांधून दिलें असें त्यांच्या चरित्रांत आहे. पण मठाचे मालक बाळशास्त्री यांचे सांगण्यांत असें येतें कीं, यमाजी पंतांनीं रुपये १५०० लष्कर ग्वालेरकडून पाठविले त्यांवर व भिक्षेवर चण्डीराम महाराजांनीं तें बांधिलें. श्रीमंत माधवराव रास्ते यांनी फक्त श्री शेषाद्रि महाराजांची समाधि बांधण्यास पैसे दिले. श्री विष्णूचे देवालय अशा खुबीनें उभारिलेलें आहे कीं प्रत्यहीं सूर्योदयाबरोबर सूर्याचे किरण श्रीविष्णूचे मुखावर यावेत.

चण्डीराम महाराजांनीं दोन ग्रंथ संस्कृतांत लिहिले. १ भक्तिकल्पलता व २ अद्वयात्मविवेक. पहिल्याचें प्राकृत करून रा. दत्तात्रय अनंत आपटे यांनीं चित्रशाळेंत छापविलेलें आहे.

---

*चंण्डीराम महाराजांच्या मठाचे हल्लीं गादीवर असलेले बाळशास्त्री यांचें म्हणणें जरा निराळें आहे. ते सांगतात कीं श्रीमंत माधवराव रास्ते यांची इच्छा महाराजांनीं श्रीकृष्णाकांठीं श्रीक्षेत्र वांई येथें समाधिस्त व्हावें अशी होती. त्यांनीं त्यांचेसाठीं समाधिहि बांधविली होती. पण महाराजांचें म्हणणें पडलें कीं अंत:कालीं दक्षिण दिशेस जाऊं नये. चण्डीराम महाराजांचें सन्निध पोहोंचवावें. तेव्हां सरंजामानिशी त्यांस खेडास पोहोंचतें करण्यांत आलें.

† १२ फेब्रुवारी १८११ इसवी.

महाराजांची कुंडली खालीं देतों:–




चण्डीरामबुवांनीं वैकुंठवास शके १७७३ पौष शु॥ १४ स केला.† त्यांची पुण्यतिथी प्रतिवर्षीं पौष शु॥ १४ थाटानें हल्लींचे मठाचे मालक बाळशास्त्री साजरी करितात. गोकुळ अष्टमीचा उत्सवहि त्यांचेच श्रमानें होतो. सर्व संस्थान त्यांनीं निव्वळ भिक्षेवर चालविलें आहे. अतिथि यांस अन्नछत्र व बैरागी यांस सदावर्त त्यांनी चालू ठेविलें आहे. मठाचा वगैरे जीर्णोद्धारहि त्यांनी केला आहे.

पाकशाला रा. सा. घमाजी बाळाजी पा। रुकारे, जे. पी., यांचे स्मरणार्थ रा. रामजी घमाजी रुकारे, जे. पी., यांनीं शके १८२६ त बांधिली.

चंढीराम बुवांची समाधि श्री विष्णूचे समोर प्रेक्षकाच्या डाव्या बाजूस व शेषाद्रि महाराजांचे उजवे बाजूस आहे. शेषाद्रि महाराजांच्या समोर नारायणबुवा अथवा नांदबुवा चण्डीराम महाराजांचे गुरूबंधु यांच्या चल पादुका आहेत. त्यांच्या डाव्या बाजूस व प्रेक्षकाच्या उजव्या बाजूस चण्डीराम महाराजांचे शिष्ये रामभटजी पाठक यांची समाधि आहे.

केदारेश्वराजवळील घाट औरंगाबादेकडील एका गृहस्थानें बांधिला. शेजारीं खेडकर जोश्यांच्या समाध्या आहेत. त्यांचे घराण्यांतील एका बाईस फार जाच होता. तिचें नांव रेणुकाबाई होतें. कन्हाडहून रुसून ती खेडास आली. धरणीस पोटांत घेण्यास प्रार्थना करितांच ती जागच्या जागीं गडप झाली. पण तिचा हात खुणें साठीं कांहीं काल बाहेर राहिला अशी आख्यायिका आहे. नंतर तिचें तेथें वृंदावन बांधण्यांत आलें. खेडकर घराण्यांत लग्नकार्य निघाल्यास वृंदावनाजवळ प्रथम जाऊन पूजा करण्याचा परिपाठ आजतागायत आहे. दरवर्षीं कार्तिक शु.॥ १२ स तुळसीचें लग्न लावण्यास खेडकर मण्डळी तेथें जातात.

---

* मठांतील अप्रकाशित संस्कृत चरित्रांतील कुंडलीशीं ही ताडून पाहिली आहे. हें शिवराम शास्त्री पाळंदे यांनीं शके १७८४ त पुरें केलें. यांत ११७ श्लोक आहेत.

† ६ जानेवारी १८५२ इ.

मुसलमानी अमदानींत व पुढें मराठी राज्यांतहि खेड चाकण चौऱ्यायशींत मोडत असे. त्याचा अम्मल चाकणाहून होई.

## खेडचीं जुनीं घराणीं

खेडकर जोश्यांची वस्ती येथें ३०० वर्षांवर आहे. पहिलें बूड शके १५३६त आलें असें म्हणतात. लष्कर ग्वाल्हेराचे बाजूनें ते इकडे आले अशी दंतकथा आहे.

त्यांच्या अगोदर जोसकीवृत्ति पाठकांची होती. ती खेडकरांस २००–२५० वर्षांपूर्वी आंदण मिळाली असें म्हणतात.

खेडची पहिली पोलीस पाटीलकी ब्राह्मणाची होती. तो काशीस गेला व मृत्यु पावला. पुढें सांडभर पाटील झाले.

सांडभरांचें पूर्वीचें आडनांव भोर. पण यांनीं सांडी मारिल्या म्हणून यांस सांडभोर–सांडभर म्हणूं लागले अशी वदंता आहे. यांच्या घराच्या पुढें मांगाची प्रतिमा आहे. आषाढांत त्याच्या समोर बकरें, कोंबडें कापितात. घराच्या मागच्या बाजूस बोवा म्हणून दैवत आहे. त्यास सणावारास भात देतात. तो पूर्वीचा सांडणीस्वार म्हणतात.

पोलिस पाटीलकीचा वार्षिक मुशाहिरा ८५॥८ आहे.

पहिली मुलकी पाटीलकी परिटाची होती. ती सातकरांकडे आली. थोरले शाहू महाराजांचे वेळेपासून निदान ती त्यांचेकडे आहे. मुलकी पाटलास मुशाहिरा दरसाल रु. ८६ मिळतो.

खेडचें कुलकर्ण चिण्यांकडे होतें. हे मूळचे कडूसचे राहणारे.

दाते यांस थोरल्या बाजीरावांचे वेळेपासूनच्या सनदा आहेत.

दीक्षित यांचेजवळ नाना॥ पेशवे यांचेवेळेपासूनच्या सनदा आहेत.

खेडास सब् जज्ज कोर्ट असून मामलेदार व सब् रजिस्टार यांच्या मोठ्या कचेऱ्या आहेत. जुन्नर वगैरे ठिकाणांच्या मानानें येथें गुन्हे कमी असतात.

भीमेचा पूल इ. स. १९१४ त बांधिला. ओढ्यावरील त्यानंतर दोन वर्षांनीं बांधण्यांत आला. हे पूल बांधण्यापूर्वी कित्येक इसम व जनावरें वाहून गेलीं होतीं.

खेडची हवा साधारण बरी असते. पाऊस सरासरी २५ इंच ३७ सेंट पडतो.

खेडास २२ वाड्या आहेत. त्यांची नांवें:—१ कोहीणकर वाडी. २ तिन्हीवाडी (सांडभरवाडीं) ३ आरुडेवाडी ४ खालील पाचारणेवाडी ५ माळेगांव ६ जैदवाडी ७ जरेवाडी ८ वरील भांबुरवाडी ९ तुकाईची वाडी १० ढेरेवाडी ११ कोतवालवाडी १२ खालील भांबुरवाडी १३ थिटेवाडी १४ राक्षेवाडी १५ पडाळीची वाडी १६ टाकळकरवाडी १७ होलेवाडी १८ धर्मरायाची मंजरे वाडी १९ वरील मांजरेवाडी २० मालघे

वाडी २१ म्हसेवाडी २२ आरबुज वाडी. दोन वाड्या उठल्या आहेत त्यांचीं नांवें १ वरील पाचारणे वाडी २ टोपेथळ वाडी. खेड व सर्व वाड्या धरून लोकसंख्या इ. स. १८७२ त ६४४६ १८८१ त ७०१५, १९११ त ८०५६ व १९२१ त ७०१३ भरली. यावरून अलीकडे लोक पोट भरण्यास मुंबईस वगैरे जातात हें सिद्ध होतें.

खेड हें खेड तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.

इ. स. १७६३ त म्युनिसिपॉलिटी स्थापन झाली होती. पण ती पुढें मोडली. हल्लीं फक्त ग्राम पंचायत आहे.

दवाखाना इ. स. १८७६ त उघडण्यांत आला. इ. स. १९२८ त यांत १२ आंत राहणाऱ्या व ८८९८ बाहेर राहणाऱ्या रोग्यांस औषधोपचार करण्यांत आले.

येथें एक वैद्यहि आहेत. खेरीज रा. साळी यांचा दवाखाना आहे.

जींत मराठी सातव्या इयत्तेपर्यंत शिक्षण दिलें जातें अशी एक शाळा असून तींत ३०० मुलें व १२ शिक्षक आहेत; या शाळेंत इंग्रजी ३ ऱ्या इयत्तेपर्यंत शिक्षणाची सोय सरस्वती मंदिरानें केलेली आहे.*

मुलींची शाळा एक आहे तींत ९२ मुली आहेत. ३ शिक्षकिणी* आहेत. अंत्यजांची ही शाळा होती. पण आतां नाहीं.

इ. स. १९२६ यांत "सोशल क्लब" स्थापन झाला. हल्लीं त्यांत २५ सभासद आहेत. त्याची इमारत बांधण्याचे काम चालू असून § त्यास व्यायाम घेण्याची संस्था जोडण्यांत यावयाची आहे.

खेडची लोकसंख्या ९५४८ असून, पुरुष ४८७७ व स्त्रिया ४६७१ आहेत मराठी शाळेंतील मुलें व मुली मिळून संख्या हल्लीं ३४० असून शिक्षक ९ व शिक्षकिणी ५ आहेत.†

---

* इ. स. १९२९-३० त. आतां पूर्ण मॅट्रिकपर्यंत शाळा मॉडर्न हायस्कूल खेड नांवाची इ. स. १९४५ पासून सुरू झालेली आहे तींत १४३ मुलें व ३२ मुली = १७५ मुलें-मुलीं आहेत.

§ हल्लीं ही इमारत पुरी झालेली आहे. [ श्री. द. र. खारकर. ]

† इ. स. १९४६ त श्री. द. र. खारकर, बी. ए. यांनीं पुरविलेली माहिती.



श्रीसिद्धेश्वराचे देवालयासमोरील श्रीभागीरथी— खेड

[ पृ. ६५–६६ पहा. ] छायाचित्र १९२९–३०, य. रा. गुप्ते

# साभार पोंच–परिचय

1. **Economic History of the Bombay Deccan and Karnatak ( 1818–1868 ). Price Rs. 8/—**
2. **Period of Transition (1818–1826). Price Rs. 6/—**

**[ Sole Agents— Deccan Book Stall, Poona 4. ]**

डॉ. आर्. डी. चोक्सी यांचीं वरील दोन्हीं पुस्तकें मराठ्यांचा आर्थिक आणि सामाजिक इतिहास अभ्यासण्यास फार उपयुक्त आहेत. आतांपावेतों अप्रसिद्ध अशा अस्सल इंग्रजी कागदपत्रांवरून डॉ. चोक्सी यांनीं पहिलें पुस्तक लिहिलें व दुसऱ्यांत हीं अस्सल साधनें प्रकाशित केलीं. पेशवाई गेल्यानंतर ब्रिटिश सरकारनें आपल्या राज्यकारभाराची दिशा ठरविण्यासाठीं ज्या गोष्टी केल्या त्यांची हकीकत मराठे साम्राज्याच्या उत्तर इतिहासाचाच एक भाग म्हणतां येईल. हा विषय घेऊन साधार ग्रंथरचना केल्याबद्दल आम्ही डॉ. चोक्सी यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

**३. सरदार सखाराम हरि गुप्ते— ले. य. रा. गुप्ते, किं. ३ रु.**

बेळगांवच्या ऐतिहासिक ग्रंथ–प्रकाशन–समितीनें प्रसिद्ध केलेलें हें चरित्र आहे असें ऐकूनच ' पां. गो. रा. ' च्या पंथांतलें ( म्हणजे दादाप्रेमी अतएव नानाद्वेषी ) हें असावें असा साहजिकच ग्रह होणार आहे. तथापि महाराष्ट्राला सुपरिचित असलेले वयोवृद्ध संशोधक श्री. यशवंतरावजी गुप्ते यांनीं आपल्या इतिहासप्रसिद्ध गुप्ते घराण्याची व विशेषतः त्यांतील रणशूर सखाराम हरीची साद्यंत माहिती देण्यासाठीं हें पुस्तक लिहिलें आहे हें कळल्यास अभ्यासक आवर्जून तें वाचतील. राघोबादादाची फार मोठी सजावट करण्याच्या प्रयत्नांत त्याचा शूर व स्वामिनिष्ठ सरदार जो सखाराम हरि म्हणजे चरित्रनायक त्याला अधून मधूनच जागा मिळाल्यामुळें, आठवणी–आख्यायिका–बखरी–इतिहास–पत्रें इ. च्या संभारांची सांधणी असतांहि चरित्रग्रंथ बांधेसूद झाला नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. सखाराम हरि गुप्ते यांची अप्रतीम स्वामिनिष्ठा आणि अचाट पराक्रम हीं मराठ्यांच्या इतिहासांत चमकणारीं असतांहि राज्यकर्त्या मालकाविरुद्ध ते गेले म्हणूनच त्यांना आपत्ति भोगाव्या लागल्या. आपल्या शत्रूच्या गोटांतील माणसाला फितुरी म्हणून सरकारनें किती छळावें, त्याला तुरुंगांत अ वर्ग द्यावा कीं क वर्ग द्यावा, यासंबंधीं नियम त्या त्या सरकारचे हेतू आणि फितुरी व्यक्तीचें सामर्थ्य यांवर अवलंबून राहाणार ! तेव्हां कारभारी नानानें सखाराम हरीला अमानुष छळलें हा त्याच्या चारित्र्याला मोठा काळिमा आहे, असें मानणें कितपत न्याय्य होईल याचा विचारच करावा लागेल. असो. सखाराम हरी-

विषयीं सर्व जातींच्या महाराष्ट्राला अभिमानच वाटला पाहिजे यांत शंका नाहीं. त्यांचें कर्तृत्व पाहून जदुनाथ सरकार प्रस्तावनेंत लिहितात त्याप्रमाणें प्रभु आणि भट यां-मधील जुने ( ग्रामण्याचे ) तंटे आणि गैरसमज यांची आतां लाज वाटून ते गाडले गेलेच पाहिजेत.

श्री. गुप्ते यांनीं आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें राघोबादादाच्या पराक्रमाची आणि गुणांची जी अवास्तव स्तुति केली आहे तीमुळें त्यांचा चरित्रनायक मार्गे पडलेला दिसतो. सर जदुनाथांचेंहि हेंच मत आहे. पहा :

" I therefore gladly commend Mr. Y. R. Gupte's book to the public, though I entirely differ from him in his estimate of Rāghobā Dādā, whose incompetence during the northern campaign of 1756–59 and character and habits throughout life disgusted me when studying the original sou rces of the history of that period. He was no hero. "

असो. एखाद्या ऐतिहासिक व्यक्तीला किती महत्त्व द्यावें हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. श्री. गुप्ते यांनीं वंशावळी, सूची, चित्रें, टीपा वगैरे मोठ्या कसोशीनें देऊन इतिहास ग्रंथमालिकेंत एक नवें सुंदर पुष्प ओंवलें आहे. त्यांनीं योजलेले इतिहासग्रंथ प्रसिद्ध करण्यास त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो व महाराष्ट्राला त्यांच्या संशोधनशील सहवासाचा चिरकाल लाभ घडो असें इच्छितों.

**4. Bibliography of the Indological Studies 1942— George. M. Moraes. The Kokan Institute of Arts and Sciences— Bombay. Price Rs. 12/8—**

झेवियर कॉलेजच्या या प्राध्यापकांनीं १९४२ सालांतील भारतीय इतिहास आणि संस्कृति यासंबंधींचे ग्रंथ आणि लेख यांची तयार केलेली ही बहुमोल सूची किती परिश्रम घेऊन बनविली असेल याचा निर्वाळा सूचीकारच देऊं शकतील. अशा सालोसालच्या सूची तयार व्हाव्या, ही अपेक्षा वाजवी आहे पण अशीं कामें हातीं घेणार किती ? त्यांना मदत किंवा सहकार्य किती लाभतें ? तेव्हां प्रा. मोराएस यांचे आभार मानले पाहिजेत. १९४३ ची सूचीहि ते संपादित आहेत.

**४ मुंबई विद्यापीठ ग्रंथालयांतील संस्कृत प्राकृत हस्तलिखितांची वर्णनात्मक सूची खंड १ व १** कर्ता–प्रो. जी. व्ही. देवस्थळी–नासिक. संस्कृत व प्राकृत भाषांतील वाङ्मय किती मोठें आहे याची नीटशी कल्पना सर्वसामान्य सुशिक्षित मनुष्यालाहि असेल असें वाटत नाहीं. ती येण्यासाठीं तंजावरचा सरस्वती-महाल, मद्रासचें हस्तलिखित संग्रहालय, भांडारकर ओरिएन्टल रिचर्स इन्स्टिट्यूट किंवा आपलें भा. इ. सं. मंडळ यांचे हस्तलिखित संग्रह प्रत्यक्ष पाहिले पाहिजेत. पण

तसें करणें प्रत्येकास शक्य होतेंच असें नाहीं. वरच्या प्रकारच्या सूची पाहिल्या म्हणजे त्यांस अशा ग्रंथसंग्रहांची कांहींशी कल्पना येईल. पण या अवाढव्य वाङ्मयापैकीं शेंकडा दहा तरी ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत कीं नाहींत कोण जाणें! बरें, जे प्रसिद्ध झाले ते ग्रंथ सर्वच्या सर्व गुणदृष्ट्या पहिल्या प्रतीचे आहेत असेंहि म्हणतां येत नाहीं. ज्यानें त्यानें आपली मति व रुचि यांस अनुसरून ग्रंथप्रकाशन केलें आहे. यामुळें हजारों पहिल्या प्रतीचे ग्रंथ अजून अप्रकाशित आणि शेंकडों अजून अज्ञातहि आहेत व असतील. असे ग्रंथ ज्या संग्रहांत आहेत त्यांच्या तपशीलवार याद्या प्रसिद्ध न झाल्या तर ते आहेत हें तरी कसें समजावें? ह्या दृष्टीनें अशा याद्यांच्या प्रकाशनाचें महत्त्व फार आहे हें ओळखून मुंबई विद्यापीठानें आपल्या संग्रहीं असलेल्या सुमारें २४०० हस्तलिखितांची ही वर्णनात्मक सूची प्रसिद्ध केली, हें त्यास भूषणावह आहे.

शेंकडों संस्कृत-प्राकृत ग्रंथकाराच्या कालाचा निश्चय अजून व्हावयाचा आहे. त्यांच्या आयुष्याची रूपरेखा व ग्रंथकर्तृत्व यांच्या विषयीं स्पष्ट कल्पना अद्याप आम्हांस व्हावयाची आहे. त्यांच्या ग्रंथांचा दर्जा कोणता हें कळून घ्यावयाचें आहे. हें सर्व समजण्यास अशा वर्णनात्मक सूचींचा फार उपयोग होतो. अशा सूची नीट तपासल्या तर आफ्रेक्टमध्यें न नोंदलेले असे किती तरी ग्रंथकार नव्यानें माहीत होतात व संस्कृत-प्राकृत-वाङ्मयाच्या अवाढव्यतेची अधिक कल्पना येते.

---

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीय-ग्रंथमाला

* हा ग्रंथ मुंबई सरकाराच्या प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयासाठीं मंजूर. ‡ हा शैक्षणिक ( training ) संस्था व शिक्षकग्रंथालयें यांसाठीं मंजूर.

| | |
|---|---|
| १ अहवाल ( शके १८३२ ) | ३ |
| २ ,, ( शके १८३३ ) | ५ |
| ३ सुचंत विचार(कै.वि.का.राजवाडे) | १० |
| ४ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३४ ) | ५ |
| ५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ (कै.वि.का.राजवाडे) | १ऽ८ |
| *६ प्रथम संमेलन वृत्त (शके १८३५) | ऽ१२ |
| *७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३५ ) | ६ |
| *८ द्वितीय संमेलन वृत्त ( शके १८३६ ) | ३ |
| *९ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३६ ) | ३ |
| *१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २० ( शिवकालीन घराणीं ) | ३ |
| *११ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३७ ) | ६ |
| *१२ तृतीय संमेलन-वृत्त(शके १८३७) | ३ |
| *१३ मुकुंद-महाभाष्य ( संस्कृत ) | ऽ८ |
| *१४ ग्रंथराज ( दासोपंत ) | ऽ८ |
| *१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला | ऽ१२ |
| *१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा | ऽ१२ |
| ***मंडळ-त्रैमासिक** प्रत्येक पुस्तक | ३ |
| *१७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३८ ) | ३ |
| १८ चतुर्थ-संमेलन-वृत्त (शके १८३८) | ३ |
| *१९ राजवाडे-खंड-स्थलसूची | ४ |
| *२० पंचम संमेलन-वृत्त (शके १८३९) | ३ |
| २२ चंद्रचूड-दप्तर-कला १ | ३ |
| २३ महाराष्ट्र-सारस्वत (संपलें) | १० |
| २४ षष्ठ संमेलन-वृत्त ( १८४० ) | ४ |
| २५ सप्तम संमेलन-वृत्त ( १८४१ ) | ३ |
| २६ संशोधकाची छोटी जंत्री | ऽ४ |
| २७ प्रदर्शन परिचय | ऽ४ |
| *२८ फारसी पत्रव्यवहार | ५ |
| २९ फार्सी-मराठी कोश | ४ |
| ३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला | १ऽ८ |
| ३१ Historical Miscellany | १ |
| ३२ पुरंदरे-दप्तर भाग १ | ४ |
| ३३ शिवचरित्रसाहित्य खं. २ रा | ४ |
| ३४ द. मध्ययु. इ. साधनें खं. १ | २ |
| ३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं. १, २ | |
| ३६ राजाराम-चरितम् | १ऽ८ |
| ३७ मंडळांतील नाणीं | १ |
| †३८ शिवचरित्रसाहित्य खंड ४ | १ऽ८ |
| ३९ गोवळकोंड्याची कुत्बशाही | रु. ४ |
| †४० ऐतिहासिक फारसी साहित्य | रु. १ऽ८ |
| †४१ दक्षिणच्या मध्ययुगीन इ.सा.खं. | २ |
| †४२ ऐतिहासिक संकीर्ण सा.खंड २ | १ऽ८ |
| ४३ मंडळ चित्र ग्रंथ चित्रें २० | ऽ८ |
| ४४ शिवकालीन पत्रसारसंग्रह खं.३ | २॥ |
| ‡४५ विजयनगर स्मारकग्रंथ | ४ |
| †४६ ऐतिहासिक फारसी सा.खंड २ | १ऽ८ |
| ४७ शिवचरित्रसाहित्य खं. ६ | १ऽ८ |
| †४८ मराठी सत्तेचा उत्तरविस्तार | ऽ१२ |
| ४९ शिवचरित्रवृत्तसंग्रह कानडा | १ |
| ५० शिवचरित्रसाहित्य खंड ७ | १ऽ८ |
| †५१ ऐतिहासिक फार्सी साहित्य ३ | १ऽ८ |
| ५२} शिवचरित्रवृत्तसंग्रह २ व ३ | |
| †५३} खंड: फार्सी विभाग प्रत्येकीं | १ऽ४ |
| ५४ पुणें नगर संशोधन-वृत्त खंड १ | रु. १ |
| ५४अ ऐ. सं. सा. खं. ३ | ३ |
| ५५ शिवचरित्रसाहित्य खंड ८ | १ऽ८ |
| ५५अ शि. च. सा. खं. ५ | ३॥ |
| ५६ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ४ | २ |
| ५७ ऐ.संकीर्ण वाङ्मय साहि.खं.१ | किं. १ऽ८ |
| ५८ शिवकालीन दंडनीति- | किं. ३ |
| ५९ पुणें नगरसंशोधन वृत्त खं.२ | किं. १ऽ८ |
| ६० ऐ. संकीर्ण निबंध खंड १ | किं. १ऽ८ |
| ६१ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ५ | १ऽ८ |
| ६२ शिवचरित्र साहित्य खंड ९ | १ऽ८ |
| ६३ हिंगणे दप्तर १ ला खंड | ३ |
| ६४ ऐ. सं. सा. खं. ६ | १ऽ८ |
| ६५ ऐ. सं. निबंध ३ | २ |
| ६६ पुणें नगरसंशोधनवृत्त खं. ३ | किं. १ऽ८ |
| ६७ महाराष्ट्रांतील कांहीं ताम्र व शिलालेख डॉ. दीक्षित | किं. ३ |

**टीप**-ट. ह. व बंगी, व्ही. पी. वगैरे खर्च निराळा पडेल. † हा ग्रंथ त्रैमासिकांत भागशः प्रसिद्ध झाला आहे. ४०-४२,४६,४८,५१, ५३ स्वतंत्रहि मिळतात.

## भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत-ग्रंथमाला

(१) मठगांवचा शिलालेख पृ. २४३–कै. रां. ब. चांदोरकर. रु. २ व रु. १०१४
(२) पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् पृ. ५०–कै. स. म. दिवेकर. रु. ०१० व ०८
(३) श्री शिवभारत मूळ व मराठी भाषांतर–पृ. ५८९ मूल्य रु. ६ व ५०१२
(४) शिवचरित्रप्रदीप पृ.३२५–कागदी व कापडी. रु.३॥ व ४ आणि रु.३।व३॥
(५) हिंदी शिल्पशास्त्र भाग १ ला. पृ. २००–कै.रा. सा. कृ.वि.वझे रु.३ व रु.२
(६) शिवकालीन जंत्री शके १५५१–१६५० पृ. २००–कै. ग. स. खरे रु. ५॥=
(७) साधन–चिकित्सा पृ. ३२०–वा. सि. बेन्द्रे. रु. ३॥ व रु. ३
(८) ऐतिहासिक पोवाडे पृ. ६१५–य. न. केळकर. रु.३ व रु. २॥
(९) वाठारकर निंबाळकर–इतिहास पृ. ३०० रु. १॥ व १०३०३
(१०) भूतेश–आख्यान (०१२ व ०१०) (११) कऱ्हाड, (श्री. य. रा. गुप्ते, बी.ए).०८
(१२) ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ६००–कै. वि. का. राजवाडे रु.३ व २०६ ०६
(१३) राजवाडे यांचे संकीर्ण निबंध ( पृ. २९१ श्री.शं. ना. जोशी रु. २ रु.१॥
(१४) राजवाडे संकीर्ण निबंध भाग ३ रा. पृ.२८० श्री. शं. ना.जोशी २व१०१४
(१७) पुरंदरे–दप्तर, भाग २ रा. उत्तर पेशवाईतील पत्रव्यवहार रु. ३ व रु. २॥
(१८) The Escape of Shivaji from Agra रावसो देशपांडे–रु.३ व २॥
(१९) लोककथा,पुस्तक१लें शं. ग. दाते कापडी, कागदी रु.१॥ व रु.१, १। व ०१४
(२०) पानसे घराण्याचा इतिहास कै. रा. ब. पानसे रु. ३ व रु. २॥
(२१) कै. वासुदेवशास्त्री खरे–चरित्र श्री. दा. मो. भट.रु. २॥ व रु.२।=
(२२) लोककथा भाग२ रा. पृ.८०–श्री. शं.ग. दाते रु.१०८ व १०४ व १०४व०१४
(२३) संपूर्ण भूषण पृ. २३०–श्री. रा. गो. काटे–रु. १०८ व १०४
(२४) शिवचरित्रसाहित्य खंड ३ रा शं.ना.जोशी व ग.ह.खरे पृ.२८२–रु.३ व रु.२०८
(२५) राजधानी रायगड पृ. १६४–श्री. वि. वा. जोशी रु. १ व ०१२
(२६) Shivaji pp. 410–C. V. Vaidya Rs. 3 and Rs. 2–8–0
(२७) आळंदी पृ. २०–श्री. ग. ह. खरे ०२
(२८) मठगांवचा शिलालेख : कुडाळप्रांतेतिहास पृ.१६५ वालावलकर रु. १०२ व ०१२
(२९) पुरंदरे दप्तर भाग ३ रा पृ. २५०–श्री. कृ. वा. पुरंदरे ३ रु. व रु. २०८
(३०) मध्वमुनीश्वराची कविता पृ. २५८–श्री. कै. प्र. व्यं. गुळ्वी ३ व २०८
(३१) मराठ्यांच्या उत्तरेकडील मोहिमा पृ. ९०–श्री. वि. गो. दिघे रु. १ व ०१२
(३२) वेदस्तुति आणि स्फुट कविता कृष्णदयार्णवकृत–किं.०१२ व ०१०
(३३) ज्ञानप्रदीप पृ. १२५–प्रो. द. वा. पोतदार रु. १ व ०१२
(३४) पेशवाईच्या सावलींत पृ. ४००–श्री. ना. गो. चापेकर किं. रु.४ व ३.
(३५) मूर्तिविज्ञान श्री. ग. ह. खरे–पृ. २५०,९४ चित्रें; मूल्य रु. ३०८ व ३
(३६) आठल्ये घराण्याचा इतिहास–वि. वा. आठल्ये पृ. ४४० ३॥–३.
(३७) किल्ले पुरंदर कृ. वा. पुरंदरे किं. १ व ०१४
(३८) किल्ले विशाळगड पं. बा. शिरवळकर पृ. ९३ किं. १ व ०१२
(३९) श्रीशिवकाव्य प्र.–ह. वा. भावे, शं. ना. जोशी पृ. २६६–रु. २॥ व २
(४०) गुण्ये घराण्याचा इतिहास वि. व्यं. गुणे किं. रु. १०
(४१, ४२) वैद्य दप्तर खंड १ व पुरवणी शं. ल. वैद्य २॥ व ३ रु.
(४३) खेड ( जि पुणें ) वर्णन ( य. रा. गुप्ते ) ०८